तो विषय वेगळा. परंतु ‘ गुणावगुणेषु वर्तंते’ इत्यादि कार्यकारणभाव व्यवहारांत पहावे लागतात.

ईशोपनिषदाप्रमाणें अविद्या, विद्या आणि ब्रह्मविद्या असा अभ्यासाचा अनुक्रम आहे. त्यांपैकीं अविद्यात्मक जो लौकिक व्यवहार त्याची सरहद्द उपासनात्मक विद्येच्या प्रांतास कशी भिडली आहे तितकेंच वरतीं दर्शविलें आहे. वेदांतील मंत्र भागांत भौतिक विज्ञानाचीं मूलतत्त्वें आहेत असें दयानंद म्हणतात व सर्व शिक्षणक्रम ते वैदिक वाङ्मयावर उभारतात. ब्राह्मण भागांत व उपनिषदांत उपासनाशास्त्र आहे. आणि पौराणिक वाङ्मयांत सृष्टिचालकाचीं अनेक गूढ रहस्यें ग्रथित केलीं आहेत असें थिऑसफिस्ट मानतात. याशिवाय सांख्य, पातंजल, न्याय, वैशेषिक ह्या शास्त्रांत भौतिक शास्त्रांचा विचार स्पष्टच आहे असें डॉक्टर ब्रजेंद्रनाथ सील वगैरे आधुनिक विद्वान सिद्ध करीत आहेत. विस्तारभयास्तव येथें प्रपंचपरमार्थाच्या या सरहद्दीवरील विषयांचा जास्त विचार करतां येत नाहीं.

लौकिक व्यवहार, धार्मिक व्यवहार, व स्वास्थ्य; अथवा केवळ प्रवृत्ति निवृत्तिपूर्वकप्रवृत्ति व केवळ निवृत्ति असे मानवी जीवनयात्रेचे तीन टप्पे आहेत. ही जीवनयात्रा एकाच जन्मांत संपते असें नाहीं. तात्यांचें चरित्र ह्यांपैकीं दुसऱ्या मुक्कामावरचें आहे व या मुक्कामावर त्यांचें जें चरित्र चमकून राहिलें; त्यास वर दिलेल्या पैलूंशिवाय खालीलप्रमाणें दुसऱ्या अनेक गुणांचे पैलू कारण झाले.

धृतिर्दाक्ष्यं समयो बुद्धिरात्मा
धैर्यं शौर्यं देशकालाप्रमादः।

श्रीधूतपापेश्वर कारखान्याचें अंतर्दृश्य.



[ पृ० ४५५

अल्पस्य वा बहुनो वा विवृद्धौ
धनस्यैतान्यष्ट समिन्धनानि ॥

म. भा. १२।१२०।३७

[ संथपणा, दक्षता, मनोनिग्रह, बुद्धिमत्ता, विचारशीलता, धैर्य, शौर्य, आणि स्थळकालाविषयीं सावधगिरी हीं आठ मूळचें थोडें किंवा पुष्कळ असलेलें धन वाढविण्याचीं साधनें होत. ]





# प्रकरण ३२ वें.

## अखेर !

**गेले बहुत पुरुषार्थाचे । गेले बहुत विक्रमाचे ।**
**गेले बहुत आटोपाचे । कार्यकर्ते । ॥**

दा. बो. ३।९।५१.

अखेर हें प्रकरण जाणाराचे दृष्टीनें कसेंहि असो, इतरांचे दृष्टीनें तें उदासवाणेंच असतें ! प्रभु राम, व श्रीकृष्ण यांच्या निर्याणप्रसंगांपासून तों अर्वाचीन इतिहासप्रसिद्ध श्रीरामकृष्णांच्या निर्याणापर्यंत हे अखेरचे प्रसंग चित्त थरारून सोडतात ! ही अखेरची वेळ प्रारब्धानुसार भिन्न तऱ्हेनें येते. 'आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां !' असे कित्येक जीवन्मुक्त संत जीवमान् असतांनाच मरून बसलेले असतात ! प्राचीन कालचे गांगेय भीष्माचार्य व दादाभाई हे आधुनिक भीष्माचार्य यांची अखेर हा एक वेगळा अखेरीचा प्रकार आहे. चितेच्या पूर्वींच चिंतेनें दग्धहृदय झालेले जीव ही याहूनहि एक कनिष्ठ अशी व्यावहारिक अखेर आहे !

सामाजिक मरण हाहि एक विलक्षण कर्मविपाक आहे. कौटुंबिकांच्या सुखसोयीकडे पहावें. त्यांच्या सामान्य तरी हौशी पुरवाव्या. आपल्या मागें राहणारांची निदान माध्यान्हकालची

तरी तरतूद करावी. निदान ब्रह्मस्व तरी कांहीं मागें ठेवूं नये. सत्तेची छाया असावी. स्वदेशांत भलेपणा मिळवावा. भाऊबंद व ग्रामस्थ यांचें तरी प्रेम संपादन करावें. त्यांना तरी आपलें अगत्य वाटेल असें महत्त्व अंगीं असावें. निदान जीवन दैन्यहीन असावें. अशा प्रापंचिकाच्या सामान्य आकांक्षा असतात, पण यांपैकीं एकहि आकांक्षा ज्याची सफल झाली नाहीं. त्यांनीं जन्मास येऊन कोणता स्वार्थ साधला ! अशा एखाद्या अभागी पुरुषाला, मग आपल्या मुलांना तरी चांगले दिवस लाभावे, त्यांस तरी सारे लोक भलें म्हणत आहेत, असें पहाण्यास मिळावें, अशी वेडी आशा लागते ! पण तीहि पुरी होऊं नये, असा कधीं कधीं प्रारब्धाचा योग येतो !

माझ्या नवयुगमालेंतील पुस्तकांचें तरी लोकांत अगत्य वाढावें असें माझ्या मनांत यापूर्वीं येत असे. पण उत्तरोत्तर तीहि आशा सुटली. तेव्हां इंग्लंडचे इतिहासांतील एक सुप्रसिद्ध धर्माधिकारी यानें जे अखेर उद्वेगपर उद्गार काढले कीं " या राजाची सेवा करण्यांत जें मी अगत्य राखलें तेंच जर ईश्वरसेवेंत राखलें असतें तर, या राजाप्रमाणें ईश्वरानें माझी वृद्धापकालीं उपेक्षा केली नसती ! " असेंच विविधमुखी नवयुगसमाजाबद्दल आज म्हणावेसें वाटतें ! आतां या निराशेचा उपयोग, हें सामाजिक मरण डोळ्यांनीं पाहण्याचा उपयोग, ईश्वराशीं अनन्यगतिक होण्यांत कितपत होतो तेंच पाहाणें आहे ! आपत्तीचा परिणाम विरक्ति आणि भक्ति यांत झाल्यास कुंतीप्रमाणें आपत्ति वरप्रदच झाली असें होईल. पुढचें ईश्वरास ठाऊक !

ही माझी उदासवाणी अखेर मी मुद्दाम तुलनेकरितां येथें वर्णिली आहे. तात्या व मी एकाच गुरूचे चेले खरे परंतु प्रकृतिभेद आणि प्रारब्धभेद यामुळें मी निराशायुक्त, खिन्न आणि ते आशावादी व

उत्साही असें त्यांच्या माझ्यामध्यें केवढें अंतर! उदास आणि खिन्न होण्याचे प्रसंग माझ्यापेक्षां तात्यांच्यावर किती तरी अधिक व वरचेवर आले होते. पण त्याचप्रमाणें त्यांचा आशावाद आणि उत्साह सारखा वाढतच राहावा, असें त्यांच्या कारखान्याच्या सेवेला यशही चढतें येत गेलें.

भीष्मासारखें न मरतां अभिमन्यूसारखें धारातीर्थीं मरावें; दादाभाईसारखें रिकामें खिचपत पडत न मरतां नामदार गोखल्यांसारखें मरावें; अशी कित्येकांची महत्त्वाकांक्षा असते. सिंहगड घेतां घेतां तानाजी गेला! पण त्याचे पोवाडे मागें राहिले. तात्यांचा आर्यौषधि कारखाना म्हणजे अनेक रोगासुरांवर पुकारलेलें एक महायुद्धच होतें. ह्या शरीररूप कुरुक्षेत्रावरील दारुण युद्धांत सदाशिवराव व विश्वासरावांसारखे बापुराव आणि गदाधर रावजी हे दोघे कर्मवीर कॉलरा व प्लेग या दोघां असुरांच्या मर्मी पडलेल्या आघातानें कामास आले! पण तात्या कचरले नाहींत! नानासाहेब पेशव्यांसारखे ते घरीं गादीवर बसून नव्हते. 'पुरःसर गदांसवें झगडतां तनु भागली!' अशीच त्यांचीहि स्थिति झाली होती! परंतु महादजी शिंद्याच्या 'बिजली' घोडीप्रमाणें तात्या ज्या महत्त्वाकांक्षेवर स्वार झाले होते, त्या महत्त्वाकांक्षेवर जबर आघात होत असतांहि "जिते रहो बेटा! यावेळीं मागें पाहूं नको, पुढें दौड कर!" असें महवत्तकांक्षेच्या मानेवर थापा मारून ते अश्विन् उत्साहानें व उमेदीनें सांगत होते! त्यांनीं रिकीबींतून पाय काढला नाहीं व खोगीर सोडलें नाहीं!

**निश्चयाचा महामेरु। बहुत जनांसी आधारु।**
**अखंड स्थितीचा निर्धारु। श्रीमंत योगी॥**

अशी तात्यांची वृत्ति होती.

स्वयें आपण कष्टावें। बहुतांचें सोशित जावें।
झिजोनि कीर्तीस उरवावें। नाना प्रकारें ॥

हें त्यांचें व्रत होतें. कर्मवीरांची अखेर त्यांच्या कार्यभूमींत काम करीत असतांनाच होत असते. महत्त्वाकांक्षी मनवारूचा हौदा हीच त्यांची समाधि !

तारीख ३० जून सन १९१४ रोजीं तात्यांना पन्नास वर्षें पुरीं होत होतीं. त्या सालीं कारखान्याची चाळिशी भरत होती. तात्यांची कारखान्याची सेवा तीस वर्षें होत होतीं. सन १८८३ सालीं त्यांच्या गृहस्थाश्रमाला आरंभ झाला. तेव्हांपासूनच ते वैद्यकींत शिरले. सन १८९३–९४ पासून तर कारखान्याचे उत्कर्षासाठीं त्यांची सक्त मेहनत झाली. ती किती प्रतिकूल परिस्थितींत झाली त्याचें वर्णन यापूर्वीं सविस्तर आलेंच आहे. या आधिव्याधींनीं आणि परिश्रमांनीं ते थकून निरुत्साही बनलेले दिसले नाहींत. त्यांच्या आयुष्यवृद्धीबरोबर त्यांचा उत्साह वाढत्याच प्रमाणांत दिसत होता. पण त्यांचें शरीर विश्रांति मागत होतें व त्यांचें अंतर्मन जनसंमर्दापासून दूर एकांतांत राहावें असें त्यांस सांगत होतें. इतकेंच काय पण आपण आरंभिलेल्या चढाईत विजय मिळवून लवकरच सेवानिवृत्त व्हावें असेंहि त्यांच्या मनांत येत होतें, आणि यामुळें त्यांच्या मनोराज्यांतील महत्त्वाच्या गोष्टी केव्हां एकदां आपल्या हातून पुऱ्या होतील, अशी त्यांस विशेष उतावळी झाली होती. या विचारांच्या काहुरानें तात्यांस अखेर कांहीं वर्षें झोंपहि लागत नसे. झोंपेसाठीं चित्तैकाग्र्य करण्याकरितां शिशाचीं लहान वजनें त्यांना निजतांना कपाळावर ठेवावीं लागत ! यावरून तात्यांच्या मनःस्थितीची कल्पना होते.

तात्यांचे मेव्हणे काशीनाथपंत व गणपतराव नवरे यांचें सौजन्य, साहस, धर्मौदार्य आणि त्यांचा वाढता अभ्युदय यांचे योगानें त्यांची

छाप तात्यांच्यावर विशेष बसत चालली होती. या बाबतींत एका व्यक्तीचा येथें विशेष उल्लेख करणें जरूर आहे. ती व्यक्ती म्हणजे तात्यांचे मेव्हणे श्री. गणपतराव ऊर्फ अण्णासाहेब नवरे हे होत. हे तात्यांचे मूळचे ग्रामस्थ व शेजारीच. त्यांचा स्नेहसंबंध पूर्वीं पासून-चाच होता. त्यांत पुढें त्यांची बहीण तात्यांना दिल्यामुळें सोयरिकहि जडली. पण तात्यांच्या स्नेही मंडळींत व नातेवाईकांत गेलीं तसि पसतसि वर्षें अगदीं बिनबोभाट ज्यांनीं आपल्या पूर्ण सहानुभूतीनें व सहकारितेनें, तात्यांच्या हयातींत व त्यांच्या पश्चात् आजपर्यंत, उत्कृष्ट सहाय्य केलें, असे हे एक अण्णासाहेब नवरेच होत. आपण होऊन ढवळाढवळ न करितां किंवा मदत करण्याचा आविर्भाव न दाखवितां हरएक लहानमोठ्या कामांत व एरव्हींहि त्यांनीं फारच कौशल्यानें पुराणिकांची बाजू राखली, यांत संशय नाहीं. असे व्यव-हारकुशल कार्यकर्ते पुरुष क्वचितच पाहण्यांत येतात. असो.

प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें तात्यांच्या कुटुंबाला व मुलांना वरचेवर नवरे यांचेकडेच जावें लागे. तेंहि एक कारण तात्यांचें नवरे बंधूंशीं जास्त संघटण होण्यास कारण झालें.

नवरे बंधू यांच्या अनेक व्यवसायांत देवळांचे जीर्णोद्धार व मुंबईस मोठमोठ्या इमारती उत्पन्नाचे दृष्टीनें बांधणें हा एक उद्योग होता. यामुळें तात्यांच्या मनोराज्यांतील इमारतींत नवरे यांच्या एंजिनिअरचा सल्ला मिळूं लागला. त्यांच्या सल्ल्यानें पनवेलचे उत्तरेस पाऊण मैलावर तात्यांनीं गिरिजाभुवन नामक आपलें राहातें घर बांधावयास घेतलें. तारीख २२ फेब्रुवारी सन १९१२ रोजीं पायाचा दगड बसविला. त्या अगोदर थोडेच दिवस ता. ११ जानेवारी सन १९१२ रोजीं तात्यांचे धाकटे बंधु गदाधर रावजी हे प्लेगनें वारले. परंतु एवढें मोठें हातीं घेतलेलें काम अर्धवट

सोडतां येईना. शिवाय वारंवार होणारा प्लेगचा ताप हें एक गांवापासून दूर राहण्याचें घर बांधण्यांतील मुख्य कारण होतें. तें कारण बंधूंचे निधनानें बळावलें. सार्वजनिक जीवनाचे पुरुषानें शकून आणि अपशकून, सुतक आणि सोयर पाहून चालतहि नाहीं. नवीन बंगल्याच्या पायाचा दगड बसविला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं तात्यांना तिसरें अपत्य व द्वितीय पुत्र झाला. त्यानंतरचे मे महिन्यांत तात्यांनीं कारखान्यापासून, नवीन होणाऱ्या त्या बंगल्यापर्यंत टेलीफोन घेतला. नवीन होणाऱ्या बंगल्याभोंवतीं बाग करण्याकरितां कोकणांतून हरतऱ्हेचें बियाणें मागविलें. पण १९१२चे जून महिन्यांत त्यांच्यावर वर वर्णिल्याप्रमाणें फौजदारी खटला सुरू झाला. हा एक मोठाच अपशकून झाला! तरी सन १९१२ अखेर बंगल्याचें काम पुरें होत आलें.

यापूर्वीं थोडे दिवस पनवेलच्या बाजार पेठेंत भयंकर आग लागून कांहीं चांगलीं घरें जळालीं. त्याच सुमारास मुंबईस सिमेंट कांक्रिटच्या इमारती बांधण्यास विशेष सुरवात झाली होती. नवरे बंधू यांचीं जीर्णोद्धारांचीं कामें सिमेंट कांक्रिटचींच होत होतीं. तेव्हां आपल्या मनोराज्यांतील सर्व इमारतींत लांकूड काम शक्य तितकें कमी वापरून त्या सिमेंट कांक्रिटच्या कराव्या असें तात्यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें त्यांचा नवीन गिरिजाभुवन हा एक बिन लांकडी लहानसा राजवाडाच बनला. तात्यांचे पणजोबांस चिरेखाण जमीन दान मिळाली. त्यांत तात्यांनीं फार धोरण खर्च करून चिऱ्यांची खाण लावून त्याचीं तळघरें बनविलीं व चिरे व दगड इमारतीला लावले. ही काटकसर व उपयुक्तता मुंबईच्या इंजिनिअरनां या इमारतींत साधली नाहीं! वरीलप्रमाणें मूळच्या चिरेखाणींतून उगम पावलेल्या द्रव्यांकुराला गिरिजाभुवन हें जें फल आलें, तें शिवस्व मानून तात्यांच्या त्यागी चिरंजीवांनीं तें यंदां शके १८५५चे आरंभीं श्री आयुर्वेदसेवेलाच अर्पण केलें हें फारच योग्य झालें.

तात्यांचें गिरिजाभुवन अथवा धोपेश्वर वाडा किंवा बंगला तयार झाल्यावर श्रीधूतपापेश्वर मंदिर व सॅनिटेरियम यांचेहि प्लॅन तयार होऊन त्याहि इमारती लवकरच बांधावयाच्या होत्या. त्यांचीहि तयारी सुरूच होती, ह्या नवीन बंगल्याची वास्तुशांत व तात्यांचे ज्येष्ठ चिरंजीव गंगाधर ऊर्फ नाना यांची मुंज हे दोन्ही समारंभ एकदम व्हावे, असें त्यांच्या प्रथम मनांत होतें. त्यांचा मुलगा हा त्यांच्या मनोराज्याचा केंद्र होता. त्याची मुंज म्हणजे पनवेलच्या इतिहासांत नमूद करण्यासारखी झाली पाहिजे, अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. संवत १९७० चे पौषांत वास्तुशांत व माघांत मुंज करावी असें त्यांनीं ठरविलें होतें. पण वास्तुशांतीचे ' मंडणा ' नंतर मुंजीचें ' मुंडण ' होऊं नये, असा कांहीं शास्त्रार्थ निघाला ! तेव्हां त्यासंबंधीं निर्णय करण्याकरितां तात्यांनीं त्यांचे एजंट भालूमामा करंबेळकर यांस लिहून राजापुरचे मराठे ज्योतिषी व माधव शास्त्री ( नवरे ? ) यांस विचारून कळविण्यास सांगितलें. व चिरंजीव नानाची कुंडली त्यांचेकडे पाठविली. या पत्राचें उत्तर पाठविण्याकरितां तात्यांच्या पत्राचेच मार्गे दोन्ही ज्योतिषांनीं एकमतानें जो अभिप्राय कळविला तो भालूमामानें सन १९१२ चे अक्टोबरांत लिहिलेला वाचण्यास मिळाला तो पुढें अनुभवास आल्यामुळें फलज्योतिषाचे दृष्टीनेंहि बराच महत्त्वाचा आहे, म्हणून तो येथें देत आहें.

चि. नानाची जन्मलग्न कुंडली. जन्म तारीख १ मार्च १९०७





तात्यांचें गुरुबंधु-मंडळ.

[ ता. २-२-१९१३ वास्तुशांतीच्या वेळचा ]

[ पृ. ४६३

फलज्योतिष—

'आठवे वर्षीं अगर त्या सुमारास परतंत्रता. विसावे वर्षाचे सुमारास आप्त मंडळीपैकीं चांगला आधार मिळून त्यांचेकडून कुटुंब वगैरे होण्याचा योग. बावीस ते चोवीस भार्येस बरेच क्लेश. एकवीस ते चोवीस स्वतंत्रता अंगावर घेण्याचें जोखम. आप्त मंडळीची चांगली मदत. मातृनिष्ठा चांगली. पितृसुख फार कमी. विद्या थोडी अपुरी. पैसाखर्च फार."

वरील माहिती भालूमामानें तात्यांस कळविलीच असेल. व त्याचा तात्यांच्या मनावर कांहीं तरी परिणाम झालाच असेल. तात्या जबरदस्त आशावादी होते. भृगुसंहितेंत पन्नासावें वर्ष जरी अनिष्ट दर्शविलें होतें, तरी पुण्यकर्माचे परिहारानें तें संकट टळून दीर्घायु प्राप्त होईल असाहि त्यांत आशीर्वाद होता. त्यावर तात्यांचा विश्वास होता. तरीपण यानंतर आपण लवकरच सेवानिवृत्त होणार व एकदां कारखान्याकडे पाठ फिरविली कीं पुन्हां तिकडे बिलकूल पाहणार नाहीं, असें त्यांच्या म्हणण्यांत येत होतें. मरणापूर्वीं चारच महिने तात्यांचे अकोल्याचे एजंट धर्मपुरी यांचेजवळ तात्या वरीलप्रमाणें बोलले होते.

तारीख ३१ जानेवारी सन १९१३ रोजीं नवीन बंगल्याची वास्तुशांत फार थाटांत झाली. छापील निमंत्रणपत्रिकेंत या इमारतीस शेतकी व बागाइतीची इमारत असें म्हटलें आहे. या एकंदर समारंभांत ब्राह्मणांचें सहस्र भोजन व इतर दोन हजार पानें झालीं असावीं. या समारंभास श्री कोंडिबा महाराज, आऊताई व इतर बरेच गुरुबंधु आले होते. त्या सर्वांचा घेतलेला फोटो या चरित्र ग्रंथांत दिलाच आहे. तात्यांच्या सांप्रदायिकांची व तात्यांची ही शेवटचीच भेट !

या फोटोंत मध्यें बसलेले श्रीकोंडिबा महाराज आणि त्यांच्या व तात्यांच्या मधें जरीचा पोशाख घालून बसलेला तात्यांचा ज्येष्ठ चिरंजीव नाना होय. धाकटा मुलगा तात्यांनीं मांडीवर घेतला आहे.

काकांच्या पश्चात् तात्यांचें कोंकणांतील लक्ष कमी होत गेलें. ते श्रीकोंडिबा महाराजांसच आपले मार्गदर्शक मानूं लागले. त्यांचें वरचेवर दर्शन घ्यावें, त्यांस पत्रद्वारें सल्ला विचारावा अशी पद्धत त्यांनीं सुरू केली; व त्यांचें बोलणें त्यांस काकांप्रमाणेंच पटूं लागलें. श्रीकोंडिबा महाराजांची स्वारी नवीन बंगल्यावर येऊन गेली, त्याच-प्रमाणें सन १९१३ चे जून महिन्यांत संकेश्वराचे श्रीमच्छंकरा-चार्यांची स्वारी तीन दिवस बंगल्यावर होती. तसेंच उरणचे सुप्रसिद्ध सत्पुरुष श्री. जीवनमुक्तस्वामी ह्यांचाहि थोडे दिवस बंगल्यावर मुक्काम होता. या बंगल्याचें नांव गिरिजाभुवन हें फारसें कोणास ठाऊक नाहीं. यास धोपेश्वरवाडा असें टोपण नांव पडलें. व यंदा आयुर्वेदमंदिर असें त्याचें नामांतर झालें आहे. त्याचा फोटो या चरित्रांत परिशिष्ट 'ब'चे आरंभीं दिलाच आहे.

सन १९१३ सालीं उन्हाळ्यांत तात्या महाबळेश्वरीं सहकुटुंब जाऊन राहिले. ते तेथें होते तोंवर त्यांचा साप्ताहिक लघुरुद्र तेथेंच होई. एकदां तर त्यांनीं महाबळेश्वरावर व त्यांच्या घरच्या बाणावर एकदमच लघुरुद्र केला. श्रीमहाबळेश्वरास त्यांनीं एकशें एकवीस धारांचें चांदीचें अभिषेकपात्र दिलें. हा महाबळेश्वरचा मुक्काम त्यांस फराच सुखावह झाला. तात्यांनीं आपल्या साऱ्या हयातींत कांहीं चैन केली असेल तर ती पहिली आणि शेवटली हीच. महाबळेश्वरच्या मुक्कामांतील दुसरी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे तात्यांचा तेथें मुक्काम होता तोंवर त्यांनीं हजार बाराशें रुपयांचा मध खरेदी केला! तेथील मधाच्या व्यापाऱ्यांनीं आश्चर्यानें तोंडांत (नुसतेंच) बोट घातलें!

सन १९१३ चे अखेर त्रिवर्ग सांडूबंधूंनीं तात्यांकडे येऊन दहा पंधरा वर्षांपूर्वींचा हिशेब चुकता केला. तेव्हां तात्या त्यांस म्हणाले

पृ. ४६४ ओळ सतरावी.

• चांदीचें हा शब्द गाळावा.

कीं, तुम्ही जें थाल तें घेऊन मी भरपाईची पावती देईन. सांडूंनीं आपल्या हिशेबाप्रमाणें बाकी चुकती केली. त्यानंतर सांडूबंधूंनीं तात्यांस आपलेकडे अगत्यानें बोलाविलें व तात्यांनींहि येण्याचें कबूल केलें. पण त्याप्रमाणें योग आला नाहीं. तथापि याप्रमाणें पुराणिक-सांडू प्रकरणाची अखेर सफाई झाली. सन १९१३ चे अखेरीस मुंबईस बँकांचीं दिवाळीं निघालीं, त्यावेळीं तात्यांचें मन बरेंच अस्वस्थ झालें होतें.

सन १९१४ साल उजाडलें. धोपेश्वर वाड्याजवळच सुमारें तीस हजार रुपये खर्चून सॅनिटेरिअम बांधण्याचें ठरलें. त्याचा नकाशाहि तयार झाला. या सॅनिटेरिअमकरितां लागणारा लोखंडी माल विलायतें-तून आणण्याबद्दल रीतसर मागणीहि गेली. या सॅनेटेरीअम सभोंवार कोणत्या देवतावृक्षांचे पार कोणत्या दिशेला बांधावे, तें महादेव-शास्त्री यांस विचारून कळवावें, असें तात्यांनीं धोपेश्वरचे भालू-मामा यांस लिहिलें.

तारीख १२ मार्च १९१४ चे पत्रांत, पुढील माघांत चि. नानाची मुंज करण्याचा विचार आहे, तोंपर्यंत सॅनिटेरिअमची इमारत पुरी झाल्यास पाहुणे मंडळीस उपयोग होईल, असा मजकुर आहे. मुलाची मुंज व सॅनिटेरिअम हा त्यांना जबर ध्यास लागला होता. तारीख ८ जुलै सन १९१४ रोजीं तात्यांनीं आपल्या कॅटलॉगाची तेरावी आवृत्ति प्रसिद्ध केली. हेंच त्यांचें शेवटचें पुस्तक म्हणून यांतील आरंभींची प्रस्तावना बहुतेक सर्व पुढें देत आहे.

## श्रीधूतपापेश्वरसंस्थेसंबंधानें माहिती.

१. हेतु—पनवेल हें वैद्यशास्त्राचें व अनेक उद्योगांचें अधिष्ठान व्हावें, असा माझा बालपणचा संकल्प; तो सिद्धीस जाणार असें आतां कळविण्यास कांहीं हरकत वाटत नाहीं. विद्यार्थ्यांना शिक्षण,

अनुभवी लोकांना आनंद आणि काम करूं इच्छिणारांची सोय, असे तीनही प्रकार येथें एकत्र झालेले पहाण्यास मिळतील.

२. श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिर ही संस्था विशेषेंकरून वैद्यशास्त्राच्या उन्नतीकरितां स्थापन झाली. श्रीधूतपापेश्वर मालक व एक व्यक्ती तिचा सेवक, असें नातें बाळगून अनेक प्रकारच्या युक्तींनीं व धोरणांनीं तिचें संगोपन केलें. श्रीकृपें या कामीं यश येऊन पहिला भाग **गर्भावस्था** पुरी होऊन **बालपण** चालूं झालें आहे अशी माझी समजूत आहे.

३. आतां याला अनेक उद्योगी व अनुभवी लोकांची मदत मिळेल त्या प्रमाणानें जोरानें वाढ होईल.

**४ या संस्थेचीं मुख्य अंगें सहा. त्यांची माहिती—**

( १ ) **श्रीधूतपापेश्वरमंदिर**—मूळ मंदिर मु० धोपेश्वर, तालुका राजापूर जिल्हा रत्नागिरी येथें आहे. पनवेल येथें तयार होण्यास थोडा अवकाश आहे. तें कधीं तयार होईल, अशी भारी उत्सुकता वाटत आहे. तयार होईपर्यंत **नित्यपूजा, दर सोमवारीं लघुरुद्र** व **ब्राह्मणभोजन** सुरूं आहे.

(२) **आर्यौषधिकारखाना**:—कुटणें, शिजविणें, गाळणें, गोळ्या वगैरे सर्व कामें अजून हातानेंच होतात. सहा फूट लांबीच्या गारयुक्त खलांतील पक्के १२० शेरांचा १ असे दोन लांबट,वाटोळे बत्ते उर्फ रूळ मागें पुढें हातानें चालणें शक्य नसल्यामुळें त्यांस एंजिनच्या शक्तीचा उपयोग केला आहे;पण त्याची गति वैद्यांकडील हाताचे खलाइतकीच सावकाश आहे. या रीतीचे लहान लांबट खल आज २० वर्षें सुरू आहेत; हल्लीं ११ वर्षें इंजनचा उपयोग होत आहे.

**श्रीधूतपापेश्वर आर्यौषधिकारखाना** व त्यांतील औषधें यांवर अनेक ग्राहक व रोगी यांचा पूर्ण भरंवसा असून त्याप्रमाणें त्यांस

फलही मिळत आहे. मनुष्यस्वभावानुरूप असलेले किरकोळ दोष नाहींसे करणें व कांहीं लोकांच्या इच्छा पूर्ण करणें हीं कामें लवकरच पुरीं होतील.

श्रीकृपें श्रीसंस्थेकडे सर्वांचें आदर व अभिमानयुक्त मन वेधलें जाईल, असा पूर्ण भरंवसा वाटत आहे.

(३) **आयुर्वेदशाळाः**—आरंभापासून ११ वर्षें सुरू राहून विशेष प्लेगमुळें हल्लीं ७ वर्षें बंद आहे. आरोग्यमंदिर सुरूं झाल्यानंतर त्याला जोडून पुनः सुरूं होईल.

(४) **आरोग्यमंदिरः**–ही इमारत बांधण्याची तयारी झाली आहे. यांत पहिला, दुसरा, तिसरा वर्ग मिळून सुमारें साठ रोग्यांची व्यवस्था खाणें, पिणें, करमणूक यांसह होऊं शकेल. हें काम पुढील वर्षीं पुरें व्हावें असें अनुमान आहे.

रोग्यांनीं आपआपल्या धर्माप्रमाणें नियम पाळून आनंद, करमणूक करावी; यायोगें त्यांस शारीरिक व मानसिक विश्रांति मिळून रोगनाश होण्यास पूर्ण मदत होते, असा आमचा अनुभव आहे. तो या साधनानें पूर्ण होणार आहे.

(५) **मुद्रणालय**–छापखाना:–यांत निरनिराळे ग्रंथ छापून प्रसिद्ध व्हावयाचे. तूर्त कारखान्याचें सर्व काम होत आहे.

(६) **शेतकीखातें**:–प्लेगमुळें बाहेर रहाण्यानें या कामीं लक्ष गेलें व वरील सर्व खात्यांना बरोबर रीतीनें मदत देऊन चालविण्यास हें खातें फार उपयोगी पडेल असें जाणून त्यावर कल्पना, परिश्रम व सुधारणा सुरू झाली.

श्रीकृपेनें सुमारें २५०० रुपये धाऱ्याची खरीप, बागाईत, रब्बी, वरकस, जंगल इ० मिळून सुमारें एकहजार एकर जमीन व एक मिठा-

गर इतकें इस्टेट संस्थेचें हल्लीं झालें आहे. २।३ वर्षांनीं हें लोकांना पहाण्यासारखें व अनुकरण करण्यासारखें होईल असें पूर्ण अनुमान आहे. दूधदुभतें व गाडीखातें हीं शेतकी खात्यास परस्पर मदतगार आहेत.

खोपविली येथील विजेच्या कारखान्याचें पाणी कालव्यानें पन-वेलीस येऊन सदरहू शेतीजवळून जाणार आहे; अर्थात् शेतीचें सार्थक पूर्ण रीतीनें होऊन संस्थेच्या सर्व खात्यांना वनौषधि, अन्न-सामुग्री, दूधदुभतें, भाजीपाला, लांकूड, कोळसे, मीठ इ. पुरविण्यास हें खातें समर्थ होऊं शकेल.

५ कारखान्यापासून पाऊण मैलावर शेतकी खात्याकरितां मुख्य इमारत तयार झाली असून तिचेजवळच **आरोग्यमंदिर, आयुर्वेद शाळा** इ. इमारती होणार आहेत.

६ आज १७ वर्षें प्लेग सर्व प्रांतांना त्रास देत आहे. त्याप्रमाणें त्याची पाळी येथेंही वर्षास ४-६ महिने येत आहे, हें कारण पूर्ण व्यवस्थेला लांबणीवर टाकीत आहे! हें कळविणें भाग पडत आहे. यामुळें बाहेर राहण्याची प्रवृत्ति होत आहे.

### भक्तिमान् व अनुभवी लोकांकरितां

७ श्रीसेवा करूं इच्छिणारांस संस्थेस मदत करण्याचे प्रकार पुष्कळ आहेत. पत्रव्यवहार करावा. येथें येऊन एक महिना आमचे-कडे रहावें म्हणजे सर्व कळून येईल. कायम राहण्याचा विचार नंतर ठरेल. या खात्यांत **विशेषें**—वैद्य डॉक्टर, इंजिनियर, यांत्रिक, शेतकी खातें, घरांत कामें केलेले व कोणत्याही खात्याचे पेन्शनर यांस येथें काम करून **स्वार्थ** व **परमार्थ** साधतां येईल.

८ सतत उद्योगी, नियमित, कुशल, परोपकारी, वैद्यविद्या व शस्त्रविद्येचे अभिमानी अशा आंग्लसार्वभौमांच्या छत्राखालीं हीं संस्था वास करीत आहे. संस्थेच्या गरज़ा सार्वभौमांकडून खचित पुऱ्या

होऊं शकतील आणि त्या झाल्या म्हणजे ही अत्यंत राजनिष्ठ संस्था आपलें काम निर्विघ्न चालवील यांत शंका कशाची ?

९ ज्यांच्या कृपें सर्व जग चालत आहे, त्यांतील अणुरेणु अशी ही संस्था सुरळीत चालावी याकरितां श्रीचरणीं अत्यंत नम्रतापूर्वक प्रार्थना करून ही अल्प सेवा पुरी करितों. कळावें."

पनवेल, आषाढ शुद्ध ११ नम्र सेवक
शुक्रवार शके १८३६ वि. कृ. पुराणिक.

## व्यवहारवैद्यकभाग १ याविषयीं

### बाराव्या आवृत्तीवरील महत्संकटनिरसन

१० बारावी आवृत्ति मोठ्या संकटांत सांपडली. सरकारनें त्यांतील इंद्रिय, नपूंसकत्व इ. शास्त्रीय शब्द असलेल्या कांहीं वाक्यां-वर बीभत्सत्वाचा आरोप ठेवून चौकशी सुरू केली. माजिस्ट्रेट साहे-बांनीं ३० रु. दंड व सर्व-दहाहजार-प्रती नाश करण्याचा हुकूम केला. तथापि या आरोपांतून हायकोर्टानें दोषमुक्त केलें. ही केवढी श्रींची कृपा झाली बरें ! साडेसातीचा फेरा, व्यय व दुःख यांमुळें मजला पुष्कळ जाच झाला. आतां पुढील अत्यंत आनंदाचे दिवस पहाण्यास व सर्वांना कळविण्यास मी शुद्ध अंतःकरणानें तयार आहें.

### तेराव्या आवृत्तींतील सुधारणा

११ **औषध घेण्याची रीतिः**—बाराव्या आवृत्तींतील विभाग दुसरा यांत अधिक खुलासेवार माहिती मिळवून हें तेराव्या आवृत्तीचें पुस्तक तयार केलें. **श्रीधूतपापेश्वर कोश** व **पथ्यापथ्यविचार** हीं पुस्तकें स्वतंत्र प्रसिद्ध होणार आहेत. **रोग्यांकरितां सूचना** व **रोगांवर उपचार** हीं पत्रकें तयार झालीं आहेत.

१२ गेल्या मुदतींत थोडीं नवीन तयार झालेलीं औषधें या आवृत्तींत अ ब क अशा संज्ञेनें त्याच नंबराखालीं घातलीं व काढ्यां-पेक्षां तयार करण्यास सोपे असे हिम व फांट हे प्रकार नं. ५६१ ते ६०० यांत दाखल केले आहेत.

१३ हल्लींच्या या पुस्तकांची किंमत एक आणा म्हणजे कागद, शाई व बांधणी यांचीच आहे. या पुस्तकांतील मजकूर जाहिरात नसून उपयुक्त शिक्षण व बोधप्रद आहे. तथापि ही किंमत देण्याचीही कोणाची इच्छा नसल्यास भस्में, अवलेह, पाक, आसवें, घृत, तैलें, अनुभविक औषधें इ० प्रत्येक प्रकारचे औषधाचें हस्तपत्रक निराळें छापलें आहे. तें मागवावें.

## चौदाव्या आवृत्तीचा आरंभ.

१४ पुढील चौदावी आवृत्ति तयार करण्याच्या कामास आजच आरंभ केला आहे. त्यांत **भस्में, रसायनें, मात्रा, अवलेह, आसवें,**... इत्यादि अनेक नवीन उपयुक्त औषधांचा समावेश व इतर योग्य फेरफार होणार आहेत."

या तेराव्या आवृत्तीच्या वेळीं तात्यांच्या श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्यांतील विक्रीस तयार वस्तूंची संख्या सुमारें सहाशें झाली होती. आणि ठळक एजंटांची संख्या अठ्यांयशी झाली होती. याशिवाय अधिग्राहक होते त्यांची संख्या बरीच होती. तात्या चालक झाल्यावर त्यांच्या हातच्या पहिल्या म्हणजे पांचव्या आवृत्तींत औषधांची संख्या व एजंटांची संख्या किती होती, तें मागें दिलेंच आहे. यावरून शरीरांत व घरांत अस्वास्थ्य व बाहेर प्लेगचा कहर अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत तात्यांनीं कारखान्याची वाढ किती केली त्याची वाचकांस कल्पना होईल.

सन १९११ सालीं आयुर्वेद शाळेच्या अभावीं त्यांनीं श्रावणमास परीक्षेची योजना स्वतंत्र हस्तपत्रकांच्या द्वारां प्रसिद्ध केली होती. त्या योजनेप्रमाणें दरसाल श्रावणमासीं वैद्यशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या श्रीधूतपापेश्वर संस्थेकडून सहा यत्तांच्या सहा निरनिराळ्या परीक्षा घेण्यांत याव्या व ज्यांस शेंकडा पन्नासपर्यंत गुण मिळतील त्या यशस्वी विद्यार्थ्यांस प्रत्येकीं पांच रुपये रोख व दहा रुपयांचीं औषधें, या कनिष्ठ बक्षिसापासून चाळीस रुपये रोख व पाऊणशें रुपयांचीं औषधें मिळावीं, अशी योजना होती. ज्यांना संस्कृत येणार नाहीं अशांनीं मराठी, हिंदी, गुजराथी भाषेंत उत्तरें लिहिल्यास त्यांस पाऊणपट बक्षीस मिळावयाचें होतें. पुढें आलेल्या अनेक अडचणींस्तव ही योजना तशीच राहिली. त्याचा निराळ्या स्वरूपांत पुनरुद्धार आयुर्वेद ट्रस्टच्या योजनेंत त्यांच्या चिरंजीवांनीं यंदा केला आहे.

यापुढील तीन चार वर्षांत श्रीधूतपापेश्वर संस्थेंत तात्यांच्या मनोराज्यांतील सॅनिटेरिअम, श्रीधूतपापेश्वर मंदिर, आयुर्वेदशाळा अशा फारच मोठमोठ्या गोष्टी व्हावयाच्या होत्या. व ते आणखी कांहीं वर्षें जगते तर त्या खचितच घडून आल्या असत्या. पण या अपूर्ण जगांत कितीहि मोठा अंक असला तरी तो अपूर्णांकच असावा असा नियम आहे. पूर्ण एक ब्रह्म होय.

मागें लिहिल्याप्रमाणें आषाढ शु. ११ ला त्यांनीं तेरावी आवृत्ति काढली. त्यानंतर श्रीगुरुपौर्णिमा रीतसर झाली. त्यावेळीं ते पावसाचे वेळींही शेतावर वगैरे जात. यामुळें त्यांची प्रकृति किंचित् नादुरुस्त झाली होती. आमवाताचा विकार त्यांना होताच. भृगुसंहितेंत यावेळीं वातविकार बळावेल असें स्पष्ट लिहिलेलें होतें. शनि व मंगळ त्यांना अनिष्ट होते. त्यांत मंगळ नीचीचा होत असल्यामुळें तो कांहीं

दिवस वाईटच आहे असें ते त्यावेळीं म्हणत. हे थोडे दिवस ग्रहमानानें कठीण आहेत. तेवढे निभावल्यावर मग कांहीं भीति नाहीं, असे उद्गार त्यावेळीं त्यांच्या तोंडून निघत. तीन चार वर्षांत कारखान्याचीं कामें पुरीं करावयाचीं व मग भृंगु संहितेंत "शिवेगुरौ महाभक्तिस्तेनांते शिवदर्शनम्" असा उपसंहार केला आहे, तो महल्लाभ मिळावा म्हणून अखेरचीं वीस वर्षें केवळ शिवभक्तींत घालवावयाचीं असें ते यावेळीं म्हणूं लागले होते. मी अखेर संन्यास घेणार ही त्यांची भाषा तर पूर्वीपासूनच होती.

आपण चार वर्षांनीं कारखान्याचा कारभार सोडल्यावर तो कोण पाहील याबद्दल त्यांचा कांहींच निश्चय झालेला नव्हता. सॅनिटेरि-अमवर मोठमोठे डॉक्टर आणून ते ठेवणार होते, पण बाकीच्या व्यवस्थेबद्दल त्यांनीं कांहींच ठरविलें नव्हतें. वास्तविक त्यांचे धाकटे बंधु रामभाऊ ह्यांनींच तो पहावा हेंच ओघास येत होतें. पण रामभाऊंचा स्वभाव त्यांस पसंत नव्हता. एवढी मोठी संस्था वाढत्या प्रमाणांत चालविण्यास रामभाऊ समर्थ कसे होतील ही त्यांना मोठी चिंताच होती, त्यासाठीं त्यांचा जीव फार रसताळे.

ता. २६ जून १९०६ ची रामभाऊंना आलेली एक चिठ्ठी आहे त्यांत " गेल्या ज्येष्ठअखेर आपण आपल्या कामाचा रिपोर्ट तयार करून धावा... आपण आपलीं कोणकोणतीं कामें समजतां, कोणतीं पुरीं होतात हें कळवून ठेवावें.... माझ्या कामाची वेळ मीं खालील प्रमाणें ठरविली आहे. सकाळीं ६–७ छापण्याकरितां काम तयार करणें; ७–९ शेतीचें काम; ९–१० श्रीधूतपापेश्वरपूजा, पांच मिनिटें भोजन. १०॥ ते ५॥ कारखाना. ५॥ ते ७॥ शेतकी काम व पाहुण्यांचें काम, ७॥ ते ८॥ पूजा, ५ मिनिटें भोजन, ८॥ ते ९॥ विशेष पाहुण्यांशीं बोलणें वगैरे. याप्रमाणें योजलें आहे. आपला प्रोग्राम कसा राहणार तें कळवावें.

. . . . .

"आषाढ शु. १ पासून आपण डायरी ठेवावी. महिना अखेर डायरी व तीवरून रिपोर्ट तयार करून द्यावा..."

"मी आतां पेन्शनर समजून तुम्हींच करणारे आहां असें मी समजत आहें."

या पत्रांत तात्यांना कामाचें व शिस्तीचें अगत्य किती होतें तें स्पष्ट दिसून येतें. अशा कर्तृत्ववान् पुरुषास शिस्त सोडून गैरशिस्त वागणाराचा सहजच संताप येतो. या पत्रांत तात्यांची जी त्यांच्या बंधूंबद्दल अपेक्षा दिसते त्यामानानें कर्तव्याची आंच रामभाऊंनीं दाखविली नसल्यास कदाचित् त्यांचे मनास अखेर त्रास झाला असावा.

आषाढ वद्य ३ ला तात्यांच्या वडिलांचें श्राद्ध होतें. पण तें त्यांस करविलें नाहीं. त्यांनीं रावजींच्या वडील मुलाचे हातून तें करविलें. त्यांची प्रकृति किंचित् नादुरुस्त आहे असें समजल्यावर त्यांचे मेहुणे श्री. अण्णासाहेब भवरे हे समाचारास आले होते, ते आषाढ वा॥ ६ रोजीं सकाळींच परत गेले. तो दिवस तात्यांचा विशेष महत्त्वाचा सोमवारचा [ ता. १३ जुलै सन १९१४ ] होता. सकाळचा लघुरुद्र रीतीप्रमाणें झाला. आमवातानें आंग दुखत होतें, म्हणून त्यांनीं अंगास तेल लावण्यास सांगितलें. तेल लावतां लावतांच त्यांना घेरी आली, त्यानंतर त्यांनीं रुद्राभिषेकाचें तीर्थ घेतलें. इतक्यांत त्यांची एकाएकीं वाचा गेली. असें त्यांनीं पाटीवर लिहून दाखविलें ! मला बोलावणें आलें. मी दुपारीं बारा वाजतां धोपेश्वर वाड्यावर गेलों. त्यावेळीं तात्या बसलेले होते. ते अर्धवट शुद्धींत होते. पण त्यांना बोलवत नव्हतें. कारखान्यांतील दांडेकर वैद्य ह्यांनीं त्यांस कांहीं औषध दिलें. ते गाफील आहेत असें पाहून मी माझे स्नेही म्युनिसिपल डॉक्टर वागळे यांस बोलावून घेतलें. त्यावेळीं येथें दुसरे डॉक्टर

नव्हते. त्यांनीं प्रकृति पाहिली. ते म्हणाले, पक्षघाताचा झटका आहे. मेंदू आणि हार्ट दोन्ही बिघडलीं आहेत. इतक्या नाजुक परिस्थितींत एवढ्या मोठ्या मनुष्याला मी औषध देण्याचें धाडस करीत नाहीं. कारण एक संभाळावें तर दुसरें जास्त बिघडेल असा धोका आहे! मग नवरे यांस ताबडतोब डॉक्टर घेऊन या म्हणून मीं तार दिली. तसेंच कोंकणांत श्रीगुरुगृहीं व सातार्‍यास श्रीकोंडिबा महाराजांकडे आशीर्वाद् व अंगारा मिळावा म्हणून मीं तारा करविल्या!

तात्यांना बसवेना, त्यांनीं मला नेऊन निजवा असें खुणेनें सांगितलें. तसें त्यांस खोलींत नेऊन निजविलें. त्यांचें कुटुंब, त्यांचे परम स्वामिभक्त सेवक दशरथशेट व त्यांचे बालमित्र सदोबा पडवळ अशी मंडळी त्यांची सेवा करीत होती. त्यांचें अंग चेपणें यापलीकडे कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. बाहेर मी व तात्यांचे एक परिचित लोकलबोर्ड ओव्हरसीअर रा. शंकरराव पुरोहित असे दोघे होतों. अप्पासाहेब पटवर्धनवकीलप्रभृति थोडी ग्रामस्थमंडळी सायंकाळीं समाचाराला आली होती. रात्रीं आठ वाजतां अण्णासाहेब मुंबईचा एक ख्रिश्चन डॉक्टर घेऊन आले. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मुंबईच्या डॉक्टरनीं येऊन पाहिलें तों आशा सुटली होती! थोड्याच वेळांत अंत होणार असें पाहून औषध न देतां ते निघून गेले! डॉक्टर गेल्यावर कांहीं वेळानें रात्रीं साडे आठाचे सुमारास तात्यांचें प्राणोत्क्रमण झालें!

व्हावयाचें तेंच झालें, असें म्हणणें भागच आहे! पण एवढ्या मोठ्या आर्यौषधि कारखान्याचे संस्थापकास व चालकास त्यांच्या अखेरच्या दुखण्यांत योग्य रीतीनें रोगचिकित्सा होऊन औषधोपचार झाले नाहींत! त्यांस त्यांचें कुटुंब, त्यांचे सख्खे बंधु, त्यांचे

मेव्हणे, त्यांचे स्नेहि, कोणाजवळहि अखेरचे चार शब्दहि बोलतां आले नाहींत ! त्यांच्या साऱ्या महत्त्वाकांक्षा, त्यांच्या लाडक्या मुलाची फार हौशीची मुंज, सारें येथेंच राहिलें ! ह्या दैवदुर्विलासांनीं दुःखावर डागण्या दिल्या ! !

तात्यासाहेब गेले ही देशाची मोठीच हानि झाली ! त्यांच्या बरोबर आयुर्वेदाचा एक मोठा पुरस्कर्ता गमावला ! रोगी लोकांचा एक कनवाळू आप्त गेला ! अनेकांचा पाठिंबा नाहींसा झाला ! पनवेलचें भूषण हरपलें ! महत्त्वाकांक्षेचा एक आदर्श पुसला ! कर्तव्याची एक कमान तुटली ! शिवोपासनेचें एक लेणें भंगलें ! एक नवलाईचें मनोराज्य लय पावलें ! आर्यसंस्कृतीचा एक मोठा सरदार कामास आला !

अशाःरीतीनें परोपरीनें नुकसान झालें ! पण या सर्वांपेक्षां त्यांच्या तरुण पत्नीचें सौभाग्य गेलें ! आणि लहानग्या नानाला द्विजत्व देण्यापूर्वीच त्याचा जन्मदाता त्यास पारखा झाला! हें दुःख फार मोठें होतें ! तात्या गेल्यानें येथील अभ्युदयाला अंधेरी आली ! धोपेश्वर वाड्याच्या गांभीर्यानें भयाणरूप धारण केलें ! मागें राहिलेल्यांचें स्वातंत्र्य भयभीत झालें ! वात्सल्य पोरकें पडलें ! तारुण्य नकोसें झालें ! पूर्वस्मृति ताप देऊं लागल्या ! भविष्यकाल निराधार झाला ! त्या दुःखाचें काय वर्णन करावें ! दुर्दैवानें ज्यांच्या नाशिबीं तें भोगणें प्राप्त झालें तेच तें जाणोत ! आतां वीस वर्षांनंतर त्या वेळच्या करुण स्थितीचें यथातथ्य वर्णन शब्दांनीं करतां येणें शक्य नाहीं.

तात्यांच्यामागें धोपेश्वर वाड्यावर त्यांची तरुण पत्नी, त्यांचे दोन लहान मुलगे व दोन मुली. त्याचप्रमाणें कनिष्ठ बंधूंच्या विधवा स्त्रियां व त्यांचीं लहान मुलें अशीं राहिलीं. त्यांचे धाकटे बंधू भाऊसाहेब हे गांवांत वेगळे राहात होते. तेच पुढें कारखान्याचे

चालक व मुलांचे पालक झाले. शिवाय मुलांचे मामा अण्णासाहेब नवरे यांचें त्यांच्याकडे पूर्ण लक्ष होतेंच !

## संक्षिप्त उपसंहार

व्यक्तीव्यक्तींचें ध्येय भिन्न असूं शकतें. वामदेवादि मुनि जन्मापासूनच मोक्षाधिकारी होते. ध्रुव, प्रल्हाद, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, हे अल्पवयांतच मोक्षाधिकारी झाले. विश्वामित्र, जनक इत्यादि राजे उत्तर वयांत मोक्षाधिकारी झाले. आणि इतर सामान्य जन साऱ्या जन्मांतहि मोक्षाधिकारी होत नाहींत. अशाहि सामान्य जनांत जे पामर जीव आहेत तो वर्ग उपेक्षणीय म्हणून सोडून दिला, तरी विषयी आणि मुमुक्षु या दोन वर्गांत तीन इयत्ता मानाव्या लागतात. भौतिक विज्ञान, लोकसंग्रह, इष्टापूर्त्यादि कर्मे, असें एखादें ध्येय मानणारा एक वर्ग व केवळ ईश्वरोपासना करणारा दुसरा वर्ग आणि केवळ ब्रह्मविद्येचा साधक हा तिसरा वर्ग होय.

मानवीजीवनरहस्याच्या वरील तीन इयत्तांचा विचार केल्यास तात्या पहिल्या वर्गांतून दुसऱ्या वर्गांत जाण्याच्या तयारींत होते. आपण तीन साडेतीन वर्षांनंतर जी कारखान्यांकडे पाठ फिरविणार ती कायमचीच, आयुष्याचीं त्यानंतरचीं त्यांच्या फलज्योतिषाचे अंदाजाप्रमाणें राहणारीं वीस वर्षें ते केवळ श्रीधूतपापेश्वराचे भक्तियोगांत घालविणार होते. त्याप्रमाणें त्यांची दुसरी यत्ता येथेंच पुरी झाली असती तर त्यानंतर तिसऱ्या यत्तेंत त्यांना कदाचित् फार वेळ बसावें लागलें नसतें. आजचें नवयुग मानवजीवनरहस्य पहिल्याच इयत्तेंत आहे असें मानून त्याच्या पुढील इयत्ताच मानीत नाहींत. याचसाठीं या चरित्रांतील ' उपासना ' या मध्य विभागांत संतांचा सदाचार व सद्विचार हीं प्रकरणें मुद्दाम विस्तारपूर्वक घातलीं आहेत.

. . . .

कोणत्याहि चरित्राचें जें बाह्यांग तो कांहीं खरा आदर्श नव्हे. तर 'स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते.' सच्चरित्रांतील चरित्रनायकाच्या बाह्य वर्तनांतील जें आंतील धोरण तो आदर्श होय. तात्यांच्या चरित्रांतील त्यांची जी शिवगुरूसंबंधीं भक्ति आणि प्रापंचिक स्वार्थासंबंधीं जी विरक्ति अथवा त्यागबुद्धि हे आदर्श होत. 'त्यागेनैके अमृतत्वमानशुः' तो त्यांचा त्यागच त्यांची कीर्ति अजरामर करण्यास पुरेसा आहे. पण ही त्यांची पहिली इयत्ता झाली, दुसरी झाली नाहीं व तिसरीला तर अवकाशच होता. हें वाचकांनीं लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे.

आपण श्रीधूतपापेश्वर संस्थेची सेवा लवकरच आवरून केवळ शिवसेवेला लागूं व अंतीं शिवदर्शनानें मुक्तीचा लाभ घेऊं, असा तात्यांना भरंवसा होता. पण !—

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं।
भास्वानुदेष्यति हसिष्यति पद्मजालम् ॥
इत्थं विचिंतयति कोशगते द्विरेफे ।
हा हंत हंत नलिनीं गज उज्जहार ! ॥

[ रात्र जाईल, चांगली पहाट येईल, सूर्य उगवेल, आणि सर्व कमलें विकसतील, याप्रमाणें कमलांत गुंतलेला भ्रमर जों मनाचे संकल्प करतो आहे तोंच हाय ! हाय ! हत्तीनें देंठासकट तें पार उपटून टाकलें !]

---

## ॥ प्रार्थना ॥

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ ९३ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥
वर्षत सकळ मंगळीं । ईश्वर निष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळीं । भेटो तयां भूतां ॥ ९६ ॥
चलां कल्पतरूंचे अरव । चेतना चिंतामणीचे गांव ।
बोलते ते अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९८ ॥
किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजि जो आदिपुरुखीं । अखंडित ॥ ९९ ॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेष लोकीं इये ।
दृष्टादृष्ट विजयें । होआवें जीं ॥ १८०० ॥
येथ म्हणे श्री विश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १८०१ ॥





## परिशिष्ट [ अ ]

# विष्णु कृष्ण उर्फ तात्यासाहेब पुराणिक यांचा कैलास-वास ! ! !*

### ( आर्या )

कर्मा मर्मा भेदी हे यमधर्मा कसा तुझा खेळ ॥
मेळ न लागे येइल कोणावरि केधवां कशी वेळ ॥ १ ॥

गुणवर्णनें कराया दुःख उणें जाहलों जरी सिद्ध ॥
बद्धप्रेमें परि त्या शोकानें हृदय होतसे विद्ध ॥ २ ॥

डोळे भरूनि येती खिन्न मनें आगळा गळा दाटे ॥
वाटे शून्य त्रिभुवन न फुटे कीं शब्दही मुखावाटे ॥ ३ ॥

हर हर तात्या गेले भवदवनवपाशराश तोडून ॥
सोडून मृत्युलोका सद्यशमणिहारभार जोडून ॥ ४ ॥

उतरे जणों कराया दुर्धर रोगांसि गांठुनी समर ॥
उमर तिशी एकतिशी विष्णु न हा देव अश्विनीकुमर ॥ ५ ॥

स्वकुलाला नच केवळ पनवेलग्राम उद्धरायाला ॥
याया लागे वाटे व्हायाला आड अंतरायाला ॥ ६ ॥

---

* नवें मन्वंतर या मासिकांत के. कृष्णाजी नारायण आठल्ये केरळ कोकिळचे संपादक यांनीं रचून प्रसिद्ध केलेलें.

विष्णु रुष्ण पुराणिक केली निज नाम कीर्ति कायम ही ॥
यमही धाके वांके मानीना धन्य धन्य काय मही ॥ ७ ॥
रोग म्हणति भोगचि हा मरण म्हणे पातलें मला मरण ॥
चरण धरुनि शरण रिघे सोडुनियां क्रूर दूर आचरण ॥ ८ ॥
गदही गद्गद कांपति पाहुनि आरोग्यमंदिराला ह्या ॥
साह्याला नच कोणी म्हणती फुटतील आमुच्या लाह्या ॥ ९ ॥
यत्तात रुष्णशास्त्री वैद्य भले चांगले पुराणीक ॥
आणकि काय वानूं शोभति रत्नांत जेविं माणीक ॥ १० ॥
बहु मितभाषी होते तरिहि पुराणीं चढे किती स्फूर्ति ॥
कीर्ति काय तयांची सौजन्याचीच ओतली मूर्ति ॥ ११ ॥
सत्त्वस्थ वृत्ति पाहुनि ठेविति गुळवे तयांस ही पदरीं ॥
सुधरील वंशवृक्ष ऐसें ये रत्न त्यांचिया उदरीं ॥ १२ ॥
सत्राशेंशायशीं शक रुष्ण ज्येष्ठांत विष्णुचें जनन ॥
मन न कसें संतोषे उत्सव करितील इष्ट कां न जन ॥ १३ ॥
तो ज्येष्ठ पुत्र झाला विष्णु हिरा सर्वही शिरावरती ॥
धरिती प्रेमें यद्गृहिं दासीशा ऋद्धि सिद्धि वावरती ॥ १४ ॥
बहु रम्य बाळ गोरें शब्द मधु बोबडे वदे वाचें ॥
जें वांचे आजवरी खेळुनियां खेळ देवदेवांचे ॥ १५ ॥
पूजा उत्सव करुनी लुटिपुटिचें करित विप्रभोजनही ॥
मनही प्रशस्त पाहुनि घेती उचलून कौतुकें जनही ॥ १६ ॥
लेखन वाचन होतां संस्कृत भाषा भराभरा शिकती ॥
टिकती पुढें न कोणी पढतां शास्त्रेंहि वैद्यकादिक तीं ॥ १७ ॥
करिती अभ्यास पुरा वैद्यकिचा जे पुण्यांत राहून ॥
साहून कष्ट घेती सत्कार्यीं देह सर्व वाहून ॥ १८ ॥
धुलते करीत होते नेकीनें फार वैद्यकी आधीं ॥
साधी रीत तरीही करिती ते निश्चयें बरी व्याधी ॥ १९ ॥

जातां परलोका ते घेई व्रत तात सर्व ह्यातांत ॥
गातात कीर्ति त्यांची कृतिला अद्यापही चहातात ॥ २० ॥
सद्वैद्य कृष्णशास्त्री होते गांवांमध्यें बहु प्रगट ॥
बिकट प्रसंग येतां देती गरिबांस औषधें फुकट ॥ २१ ॥
बोलावितां मध्यान्हीं येई तोंडांतुनी कधीं ना न ॥
आन न म्हणती कोणां ह्यास्तव होता चहूंकडे मान ॥ २२ ॥
विष्णु ज्येष्ठ सुताला पहिल्यापासून बोलती तात्या ॥
जात्याच दक्ष असुनी सद्गुण सच्छील दे विधाता त्या ॥ २३ ॥
जरि वडिल औषधाची नाडी पाहूनि योजना करिती ॥
पर तीं सर ती लौकर त्यांची सांठ्यास पाहिजे भरती ॥ २४ ॥
ह्यास्तव ग्रंथांतरिं जीं मात्रा गुटिका रसायनें भारी ॥
ह्यारीनेंच करोनी ठेवावीं विपुल संग्रहीं सारीं ॥ २५ ॥
येतांच कल्पना ही तात्यासाहेब लागले कामा ॥
कोनामाजि बसोनी केला आर्यौषधींस ओनामा ॥ २६ ॥
त्याचाच आज झाला काय अवाढव्य कारखानाच ॥
ताना चढवुनि चाले लक्ष्मीचा सारखा जिथें नाच ॥ २७ ॥
शास्त्रोक्त पाठ पाहुनि करिती ते सिद्ध लक्ष लावून ॥
दावून नित्य वडिलां ठेविती एकेक नीट लावून ॥ २८ ॥
पेट्या फळ्या कपाटें सरती भरती पुढें पुढें खोल्या ॥
ओल्या सुक्या वनस्पति जमुनी झाल्या कितीक लाखोल्या ॥ २९ ॥
होती कितीक मात्रा भस्में चूर्णें रसायनें काढे ॥
गाढे प्रयत्न होतां खपहि त्यांचा पुढें पुढें वाढे ॥ ३० ॥
व्यर्थ खटाटोप कधीं केला नाहींच जाहिरातींचा ॥
मातीचा काय डसे पाय हवा यत्न सर्व जातीचा ॥ ३१ ॥
निर्व्यसनी धर्मात्मा नीतिविशारद अखंड उद्योगी ॥
योगी कां न म्हणावा इहपर लोकांत भाग्य जो भोगी ॥ ३२ ॥

चैन न ठावी ज्याला मार्गें न सरे करावया कष्ट ॥
इष्ट फलार्थ विवेकी तोच यशाचा धनी असे स्पष्ट ॥ ३३ ॥

जागा पुरे न तेव्हां बांधुनी मजल्यावरी नवे मजले ॥
धजले पुढें सराया जागा घ्याया नव्या नव्या सजले ॥ ३४ ॥

पनवेलीच्या खालीं भरला आहे समस्त पाषाण ॥
वाण नसे दगडाची कोठेंही जाण लागते खाण ॥ ३५ ॥

जाणों म्हणोनि करिती पहिल्यापासूनि योजना नामी ॥
कामी दगडहि लागे देतो उपदेश हा जनांना मी ॥ ३६ ॥

लावुन सुरंग खालीं उडवुनि देती धडाधडा दगड ॥
अवघड काय मनुष्या सर केले धरुनियां उमेद गड ॥ ३७ ॥

दगडाचे खलबत्ते डोण्या दगड्या अनेकविध पाटे ॥
घाटे समान वजनें केलीं त्याचीच धन्यता वाटे ॥ ३८ ॥

मग लावुनि पाथरवट कोरविती लांब खांब सोपान ॥
सोपान एक चारी करिती हा खचित यत्न सोपा न ॥ ३९ ॥

होतां असा पसारा कारण लागे अनेक भृत्यांचें ॥
कित्यांचें वळण बरें देती लावून काम नित्याचें ॥ ४० ॥

उष्णें कुमारि आसव फोडुनि बरण्या फटाफटा टाकी ॥
नाकीं नऊच येती यास्तव दगडांत कोरली टांकी ॥ ४१ ॥

आंसव अरिष्ट बिघडं म्हणुनी थंडांत ठेवणें भाग ॥
भागत नाहीं समजुनी कोरुनि काढिति अनेकविध भाग ॥ ४२ ॥

शुक्लेंदुसें भरारे तात्यांचें भाग्य ईश्वरी देणें ॥
जेणें अद्भुत ऐसें कोरुनि दगडांत काढिलें लेणें ॥ ४३ ॥

देतां पगार रक्कम प्रतिमासीं पांच चारशें खरचे ॥
वरचेवर जाणारे सोडुनि जाणों समस्त ते घरचे ॥ ४४ ॥

सोलाया तोलाया वरिवरि दारें समस्त खोलाया ॥
बोलाया परभाषा म्हणति सुखें उचित तेंच बोलाया ॥४५॥

तोडाया मोडाया झोडाया आळसास सोडा या ॥
जोडाया सोडाया टाइप कीं करवतीस ओढाया ॥ ४६ ॥

पोटास काय कमती नोटांना काय रे असे तोटा ॥
लोटा झाडा किंवा भस्में मात्रा असंख्य घ्या घोटा ॥ ४७ ॥

कोणी अनाथ येतां लाविति त्याला सदैव अन्नास ॥
खिन्नास धीर देती विद्वच्छ्रेष्ठांस पांच पन्नास ॥ ४८ ॥

भिस्त न कोणावरती शिस्त महा स्ट्रिक्ट जेविं आफीस ॥
माफीस साफ नाहीं बक्षिस देती खऱ्या शिताफीस ॥ ४९ ॥

औदार्य काय वानूं कर्णाचा तो खराच अवतार ॥
भवतारक गुण सारे लागे अन्याकडे न लव तार ॥ ५० ॥

सांगावी काय कशी मागणिची येउनी पडे-झडती ॥
अडती गांवोगांवीं होउनि मनि आर्डरी किती झडती ॥ ५१ ॥

दुःखी कष्टी येउनि होउनियां नीट हर्ष जो पावे ॥
ओपावें द्रव्य बरें तेणे श्री कीर्ति वृक्ष फोफावे ॥ ५२ ॥

कोठें तुळया वांसे खांब भले लांब लांब लोखंडी ॥
खंडीत पाव रती जें लागे लोखंड शेंकडों खंडी ॥ ५३ ॥

येतां चित्तीं वित्तीं खर्च कराया मुळीं बरा नाहीं ॥
ना नाहींच कुणाला घेती येतांच छापखानाही ॥ ५४ ॥

झाले कुबेर दुसरे अनुकुल होते घरांमधें सर्व ॥
पर्व महद्भाग्याचें आलें तरि लेशही नसे गर्व ॥ ५५ ॥

झालें पवित्र हृद्यीं ईश्वरभक्तींत नित्य न्हाऊन ॥
राहून दुर्गुणांचा शिवला सद्भाग्य काय याहून ॥ ५६ ॥

कुलदैवत म्हणुनि बहू भजती ते नित्य धूतपापाला ॥
बापालाही प्रिय जें न मिळे सेवूनियां तपा पाला ॥ ५७ ॥

धन पाहुनि मन फिरतें स्वार्थाचा वाढतो पुढें वाटा ॥
वाटाघाट करोनी म्हणती काढोन टाकितों कांटा ॥ ५८ ॥

साधेपणांत ऐशा संस्था ह्री चालवीन मी अंगें ॥
गंगेसमान राहुनि पुत्रांची कोण खातरी सांगे ॥ ५९ ॥
पुढती निघेल जरि ह्या पुत्रांपौत्रांत एक रंगेल ॥
व्यंगें लक्ष शिरोनी माझा सगळाच हेतु भंगेल ॥ ६० ॥
देवास सर्व अर्पूं केला संकल्प बापलेकांहीं ॥
टेकाही बंधूंचा म्हणती नाहींच वावगें कांहीं ॥ ६१ ॥
बोले प्रियकर बंधो अणूं नका लेशही मनीं रागा ॥
वागा नीट जपोनी अविचारानें नका करूं त्रागा ॥ ६२ ॥
दुर्मिळ संधी आली सज्जनसेवेमधें सदा जागा ॥
लागाच सिद्धतेला जोड असे कोण हो महाभागा ॥ ६३ ॥
बंधू प्रमोदसिंधू बोलति हें मान्य सर्वही आम्हां ॥
मामा जामातातें लागति आणुनि भराभरा कामा ॥ ६४ ॥
गांवोगांवीं साऱ्या थाटानें स्वर्णपत्रिका जाती ॥
कां जातील न सज्जन संधि मिळे योग्य काम काजा ती ॥ ६५ ॥
मोठेमोठे डॉक्टर वैद्यजनांचे नवे थवेच थवे ॥
रथवेगें धडधडले शोभा ती आज काय हो कथवे ॥ ६६ ॥
शास्त्री पंडित पाहुनि म्हणती समुदाय काय ह्रा जमला ॥
श्रमला परंतु अपुल्या येण्यानें हर्ष होय आज मला ॥ ६७ ॥
उत्तम करावयाला चुकलें नाहींच आदरातिथ्य ॥
मिथ्यत्व यांत नाहीं लिहिलें सर्वेंच का यथातथ्य ॥ ६८ ॥
दुरुनी दुरुनी आले लोक पहायास तो समारंभ ॥
आरंभला मुहूर्तें ज्यांत नसे लेशमात्रही दंभ ॥ ६९ ॥
येवोनि कृष्णशास्त्री बोलायाला सभेमधें उठले ॥
उठले पुलक शरीरीं प्रेमसुधेला खरे झरे फुटले ॥ ७० ॥
स्वागत करोनि म्हणती दुर्लभ लोकांत जें उपायशतें ॥
वश तेवढेंहि आम्हां होउनि दे ईश्वरी कृपा यश तें ॥ ७१ ॥

औषधि होत्या थोड्या वैद्य जरी प्रथम आमुचे बंधू ॥
बिंदूचा सिंधु करी धोपेश्वर नित्य जो कृपासिंधू ॥ ७२ ॥
हा सर्व कारखाना दिसतो जो आज येथ सकलांस ॥
टिकला सर्व तऱ्हेनें शाला, आधार अंगनिकलास ॥ ७३ ॥
आहे सर्व तयाचें अमुचें किंवा नव्हेच भावांचें ॥
रावाचें रंकांचें अमुचें केवळ निमित्त नांवाचें ॥ ७४ ॥
देणें ज्याचें त्याची सत्ता असणें अखंड हें इष्ट ॥
स्पष्टपणें सांगाया कष्टविले मी विशिष्ट हे शिष्ट ॥ ७५ ॥
संस्थेंत या नसावी स्वार्थाची लेशमात्र वार्ताहि ॥
आर्तांला सुखकारक तारक ऐशीच हो भवार्ताहि ॥ ७६ ॥
संस्था सर्वांचीही कायावाचामनें अम्हीं खपणें ॥
जपणें सर्वांनींही म्हणुनी मी सांगतों प्रसिद्धपणें ॥ ७७ ॥
संस्था नीट रहावी न घडो कोणाकडोनि उपसर्ग ॥
संसर्गही न बाधो ह्यास्तव करितों समस्त उत्सर्ग ॥ ७८ ॥
संस्थाही देवाची प्रतिनिधि समजून आमुचा वंश ॥
भ्रंश नसे मतिला तो घेवो निर्बंध आपुला अंश ॥ ७९ ॥
धार्मिक तलाव बांधुनि दीना नाथास देतसे तोष ॥
रोष नव्हे तोच नव्हे घेतां त्यांतील अल्प जल दोष ॥ ८० ॥
प्रेमें विनयें ऐशी बहुबहु गंभीर बोलुनी वाणी ॥
श्रीधूतपापचरणीं करुनी संकल्प सोडिलें पाणी ॥ ८१ ॥
जयघोषें डुमडुमलें गगन जयीं पुत्र फायदे वाची ॥
ठेवा चित्सौख्याचा किंवा ती पुष्पवृष्टि देवांची ॥ ८२ ॥
ऐशी लोकहिताची आपुल्या देशांत एक संस्था न ॥
संस्थान एक वाटे गांठिती वानीत आपुलें स्थान ॥ ८३ ॥
स्वार्थाचें तृण निघतां जोरानें वृक्ष फार तो फुलला ॥
खुलला शाखापर्णीं कोण न पाहोन त्याजला भुलला ॥ ८४ ॥

परि येती सुखदुःखें एकामागून एक कालगती ॥
डगती न सत्त्वशाली त्यांतुनिही धीर वीर ते तगती ॥ ८५ ॥

पहिली भार्या जाउन तात्याही शोकसागरीं पडले ॥
घडलें कार्य पुन्हां तें करितां स्त्रीरत्न यत्न सांपडलें ॥ ८६ ॥

सद्गुणमुक्ता शोभति केला गुंफोनि जेंवि एक सर ॥
अवसर जातां पहिला तात्यांनाही पुढें पडे विसर ॥ ८७ ॥

पुढती विचार करिती गुरुवांचुनि जन्म हा असे वाया ॥
देवा यास्तव दे मज योग्य गुरुस्थान नित्य सेवाया ॥ ८८ ॥

धोपेश्वरांत होते काका उपनामही पुराणीक ॥
माणीक झांकलेलें सत्यव्रत भक्त जे प्रमाणीक ॥ ८९ ॥

तात्या समक्ष जातां होते जरि फार ते वयोवृद्ध ॥
शुद्ध प्रेम बघोनी झाले तरि शीघ्र यावया सिद्ध ॥ ९० ॥

सत्कारें निजसदनीं आणुनि घेती स्वयें अनुग्रहही ॥
निग्रह असे मनाचा त्याला अनुकूल सर्वदा ग्रहही ॥ ९१ ॥

पुढती मनांत आलें व्हावी सत्कार्यकारणीं स्फूर्ति ॥
कीर्ति श्री वाढावी म्हणुनि असावी समीप गुरुमूर्ति ॥ ९२ ॥

असती प्रसिद्ध लोकीं म्हात्रे हे मूर्तिकार बहुकुशल ॥
कुशलवसे बंधुद्वय संपादुनि कीर्ति राहती कुशल ॥ ९३ ॥

यांच्या हस्तें उत्तम संगमरवरी घडून गुरुमूर्ति ॥
आर्ती फार दिसांची स्थापुनि करिती गृहांमधें पुर्ती ॥ ९४ ॥

गुर्वोत्सव तात्यांचा होय अलंकार तो नवा नांवा ॥
मानावा हर्ष किती शब्दें कैसा यथार्थ वानावा ॥ ९५ ॥

शास्त्री पंडित येती वरचेवरि त्यांजला नसे खंड ॥
मंडन करावयाला आले प्रत्यक्ष 'धर्ममार्तंड' ॥ ९६ ॥

नानाविध पक्वान्नें खातां खातांच विप्र ते दमती ॥
जमती तमाम सारे कीं नाहीं दक्षिणेसिही कमती ॥ ९७ ॥

नंतर पुराण कीर्तन बहु गोडगोड आख्यानें ॥
व्याख्यानें सुरस किती दाहि दिशांना यशासि आख्यानें ॥ ९८ ॥
गुणिजनगायकनायक काढुनि गाती नव्यानव्या ताना ॥
गातां नाना रीति करिती सत्कार फार जातांना ॥ ९९ ॥
गुरुही समर्थ होते रामोपासक सदा शुचिर्भूत ॥
पूत सदा सत्कर्में ज्ञान दयाशांति दांतिजीमूत ॥ १०० ॥
झाले प्रसन्न हृदयीं शिष्याचा भक्तिभाव पाहून ॥
राहून काल कांहीं जाती परतून कष्ट साहून ॥ १०१ ॥
ज्ञानोपदेश त्यांचा करिती तात्या यथामुखें श्रवण ॥
कवण असा भाग्याचा होई गुरुला स्वयेंचि आंगवण ॥ १०२ ॥
प्रियकर पिताहि त्यांचा सोडुनि इतक्यांत जाय हा लोक ॥
लोक बहू हळहळले तात्यांचा तो न वर्णवे शोक ॥ १०३ ॥
काळ कसा निर्दय हा धर्माचा बोलुनी चहाता ने ॥
धाता नेम न चुकवी देती दानें उदार हातानें ॥ १०४ ॥
पुढती परिवारासह तात्या जाती करावया काशी ॥
राकाशी कीर्ति जना सुखवुनि चढली जाणों चिदाकाशी ॥ १०५ ॥
दिधल्या विद्वानांना सन्मार्गे स्वर्णमुद्रिका शाला ॥
आशा लाविति नाशा भीति न दे द्रव्यमोह पाशाला ॥ १०६ ॥
तात्या परतुनि आले वडिलांच्या अस्थिही विसर्जून ॥
वर्जूनि तीर्थयात्रा राहे तेथेंहि कीर्ति गर्जून ॥ १०७ ॥
ग्रामीं येती जों तों तात्यासाहेब घेउनी गंगा ॥
संचारार्थ जगद्गुरु येती जाणों मठस्थ शिवगंगा ॥ १०८ ॥
प्रत्येक प्रश्न येतां लाविति तात्या सदा विचार पणा ॥
कृपणास लाज आणी ऐसा सत्कारणीं उदारपणा ॥ १०९ ॥
सन्मानुनी जगद्गुरु करिती थाटांत पादपूजाही ॥
कांहीं विशेष नाहीं पावन केली सदा वपु जयांहीं ॥ ११० ॥

करिती जगद्गुरूतें तुष्ट बहू पादपद्म सेवून ॥
ठेवून भक्ति चरणीं पूजाद्रव्यादि सर्व देवून ॥ १११ ॥
भोया स्वार शिपाया उचित अशी देणगी महातास ॥
हा तास म्हणाति दुर्लभ नित्य असो हेंच काम हातास ॥ ११२ ॥
गुरुचा प्रसाद मिळतां झालेसें वाटलें महत्कार्य ॥
आर्यभिषक्चूडामणि पदवी देवूनि जाति आचार्य ॥ ११३ ॥
गंगापूजन करिती वाद्यांचा चालला महाघोष ॥
दोष न रोष निमाला दुमदुमला मूर्तिमंत संतोष ॥ ११४ ॥
पतिांबर कद उंची देती वांटून आप्तइष्टांस ॥
शिष्टांस हेममुद्रा उचित अशा देणग्या वरिष्ठांस ॥ ११५ ॥
लांबुनि येती जनही जमला समुदाय काय घनदाट ॥
वाटहि मिळे न जाया पक्वान्नाचा न वर्णवे थाट ॥ ११६ ॥
बहु धन्यवाद देती पाहुनिया बेत सर्व भावास ॥
गांवास होय भूषण तात्यांच्या वानिती स्वभावास ॥ ११७ ॥
पुढती विचार करिती वैद्यकसंमेलनांस भरवावें ॥
गिरवावें वळण बरें द्रव्य न कोणी निरर्थ सरवावें ॥ ११८ ॥
आमंत्रणें करोनी साहित्यामाजि जाहलें मग्न ॥
विघ्न मधें येउनि परि तात्यांचें चित्त जाहलें भग्न ॥ ११९ ॥
बापू मधील बंधू साह्य रवींचें जणों म्हणों अरुण ॥
करुण प्रसंग आला जाउनि ते शांत सद्गुणी तरुण ॥ १२० ॥
मुंबापुरींत वाखा होउनि सोडोनि जाय भूलोक ॥
लोक बहू हळहळले दुःसह सर्वांस होय तो शोक ॥ १२१ ॥
संमेलन बंद नको म्हणती ते आवरून शोकास ॥
लोकांस धीर देती कधिंही भ्यावें न मृत्युलोकास ॥ १२२ ॥
बहुसाल वैद्य आले नामांकित तज्ञ मंडळी खाशी ॥
झाशीकाशीहुनिही होते कितिएक बारशीवाशी ॥ १२३ ॥

हलती डुलती खुलती दिव्य पताका नव्या नव्या रंगीं ॥
रंगी सर्व मिळाले वाव न तेथें शिरावया मुंगी ॥ १२४ ॥

मथुरा गया अयोध्या मथुरा डाका तसाच कलकत्ता ॥
यत्ता न त्यास मिळती ही केवळ एक ईश्वरीसत्ता ॥ १२५ ॥

पंथहि किती निराळे जाती गोती किती तरी भिन्न ॥
अन्न न चाले परकी कोणाचें सर्वही परिच्छिन्न ॥ १२६ ॥

ज्या ज्या वेळीं जें जें लागे सामान जें जसें ज्याला ॥
राजालाही दुर्घट पुरविती ते सर्वही समाजाला ॥ १२७ ॥

जो तो म्हणे अहाहा तात्यांचा काय हा पहा बेत ॥
देत दुवा म्हणती ते घरिंही राहे अशी न तब्येत ॥ १२८ ॥

स्नानाला संध्येला उपहारालाहि वेळच्या वेळीं ॥
केळीं द्राक्षें अंजिर लाडू पोहे अनेक विध भेळी ॥ १२९ ॥

जेवायाला बसतां रांगोळ्या सर्व सारखे पाट ॥
वाटत नवल बघोनी पक्वान्नाचा नवा नवा थाट ॥ १३० ॥

गाद्या गिरद्या लोडें सतरंज्या गालिचे वरी तक्के ॥
धक्के सोशिति सगळे ऐसे केले भरोनियां पक्के ॥ १३१ ॥

पुष्पें पानसुपारी हारतुरे अत्तरें हिनामरवा ॥
परवा नसे तयाची कोणी किति घेउनी तुम्हीं सरवा ॥ १३२ ॥

नानाविध वस्तूंनीं भूषविती सर्व मंडपस्थान ॥
आस्था नसे कुणाला झोंप तदा एकही गृहस्था नं ॥ १३३ ॥

गजबजला फलपुष्पें कलिका येऊन जणों सुजनवेल ॥
गणवेल काय कोणा भरुनी गेली समस्त पनवेल ॥ १३४ ॥

गांवाची किति तरिही वाढे म्हणती समस्त संप्रति भा ॥
प्रतिभानूच उदेले वैद्य जयांची न वर्णवे प्रतिभा ॥ १३५ ॥

होय उहापोह बरा शास्त्राधारें बहू बहू सुरस ॥
सुरसद्मींचीच सुधा इहलोकींचा नव्हेच इक्षुरस ॥ १३६ ॥

अद्भुत वनस्पती किति दुर्घट ज्यांचें जनांस दर्शनही ॥
स्पर्श न करास ज्यांचा जमवुनि केलें तिथें प्रदर्शनही ॥ १३७ ॥

एका वनस्पतीसह खडिसाखर घेउनी कुणी खाती ॥
मातीशी चव लागे आश्चर्याची खरीच सीमा ती ॥ १३८ ॥

कोणी कोणी जाळिति शंखद्रावांत आवडी कवडी ॥
दवडी न संधि कोणी वह्नीनें जेथ होय तोय वडी ॥ १३९ ॥

ऐशा लोक चमत्कृति पाहुनियां तृप्त जाहले शतशा ॥
हृत शास्त्रहृद्य म्हणती कोठें कधिं पाहिल्या न लेश तशा ॥ १४० ॥

वैद्यकसंमेलन तें होतां थाटांत यापरी पुरतें ॥
पुरतें उदास झालें निष्प्रभ दिसती समस्त गोपुरतें ॥ १४१ ॥

सत्कार्य उद्भवोनी केव्हां मी सिद्धतेस लागेन ॥
लागे न खर्च म्हणती तात्या घेती कधींच मागें न ॥ १४२ ॥

जिल्हा सभा करावी म्हणतां सन्मित्र फार हित करती ॥
परतीं सारुनि कामें आनंदें सर्व सिद्धता करती ॥ १४३ ॥

बहु बहु विनयें केलें आदर आतिथ्यें सर्वथा त्यांनीं ॥
ज्यांनीं विलोकिलें तें केली सर्वत्र धन्यता त्यांनीं ॥ १४४ ॥

विद्वद्रत्नें यत्नें आणीती त्यांजला नसे जोड ॥
कोण पुरें ऐकुनियां एकाहुनि एक भाषणें गोड ॥ १४५ ॥

ज्यांच्या सुविचारांची दीनानाथाकडे वळे सरणी ॥
करणी पाहुनि जाणों संतोषें तृप्त होतसे धरणी ॥ १४६ ॥

वरचेवरि वर्णन हें ऐकुनि येइल जनास कंटाळा ॥
आळा मनासि घालुनि या वेळीं मीहि देतसें टाळा ॥ १४७ ॥

बजबजलें गांव बहू औदास्याचें मुळींच नांव नसे ॥
पावन सेवा करुनी जातां जन जाहले तदावनसे ॥ १४८ ॥

प्रत्येक सोमवारीं करिती लघुरुद्र विप्रही अकरा ॥
न करा कां धर्म करें म्हणती अनुकूल काळ तोंच करा ॥ १४९ ॥

तें पुण्य फळा आलें भरभरला फार कारखानाही ॥
दाही दिशांस पाही तोडीला याजसारखा नाहीं ॥ १५० ॥
माणुस पुरें पडेना न मिळेही काल साल कापाया ॥
मापाया माल नवा लिहिलेलीं पुस्तकेंहि छापाया ॥ १५१ ॥
म्हणुनी इंजिन आणुनि त्याची करतांच योजना खाशी ॥
शाखा शीघ्र करोनि औषधिच्या पाडल्या नव्या राशी ॥ १५२ ॥
खल चालती भरारा घेति फळ्या लांकडेंहि कापून ॥
स्थापून छापखाना काढिति बहु पुस्तकेंहि छापून ॥ १५३ ॥
दुरुनी दुरुनी येती ऐकुनियां नांव रोज गद्‌युक्त ॥
उक्त न वसती स्थानें व्याधींतुंनि शीघ्र व्हावया मुक्त ॥ १५४ ॥
यास्तव भव्य इमारत गांवापासूनि दूर बहुरोगी ॥
भोगी शुद्ध हवेंत सोइस्कर बांधिती मनाजोगी ॥ १५५ ॥
त्यांचे बेत कितीतरि आम्ही पडलों परंतु हतभागी ॥
आगींत लोटुनी तें ठेवी हा मृत्यु जागच्या जागीं ॥ १५६ ॥
पहिला सुपुत्र होतां उत्सव करिती पहा महा हर्षे ॥
वर्षें करुणाघन तो कीं नव्हता पुत्र त्यांस बहु वर्षें ॥ १५७ ॥
सौख्यांत पोहती तो दुःख पुन्हां ईश्वरें तया दिधलें ॥
अद्‌ले दिवशीं उत्तम असुनि पहा बंधु वारले मधले ॥ १५८ ॥
तेणें पुनरपि पडले दुःखाच्या थोर ते प्रवाहांत ॥
हा तरवार मनाला दुःसह गेला म्हणो जणों हात ॥ १५९ ॥
तरिही पुढें चालविती धैर्यानें धीर वरि तें चक्र ॥
वक्रदशा सर्वांना न सुटे म्हणती तयांतुनी शक्र ॥ १६० ॥
लोकोपयुक्त होते थोर तयांचे विचार बहु गहन ॥
दहनचि केलें काळें त्याला होई न चांगलें सहन ॥ १६१ ॥
संगीत नाटकाचा देशीचा तरि जना असे नाद ॥
स्वाद न घेई ऐसा तात्यांचा एक मात्र अपवाद ॥ १६२ ॥

खेळाला वेळ नसे मानिति मातेसमान परजाया ॥
वरजाया तर करिती सिद्ध सदा धर्मशास्त्र परजाया ॥ १६३ ॥
परिचित जाण किं त्याचें होते जे जे विचार बहु खोल ॥
मोल न ठावें ज्यांना त्यांना वाटेल सर्व हें फोल ॥ १६४ ॥
मित्र प्रेम मिळालें दैवें त्यांचेंहि एक तप मातें ॥
उपमातेसम होइल कथिलें देउनि कितीहि उपमातें ॥ १६५ ॥
हा हा द्वितीय पत्नी विव्हल शोकें म्हणेल सुकुमार ॥
अकुमारक पत्नीहुनि मी हतभागी असोनि सुकुमार ॥ १६६ ॥
बृद्धपणीं शोकानें करिल किती हायहाय तरि माय ॥
काय करूं जाय न हा काय म्हणे सर्वथैव मी गाय ॥ १६७ ॥
आप्तांवरती पडला दुःखाचा मुसळधार पाऊस ॥
भाऊ सख्खा जातां वाटावें काय रामभाऊस ॥ १६८ ॥
हा हा पडला आतां भार खरा फार एकट्यावरती ॥
बावरती थोर तुम्ही सोडुं नका धैर्य एक पावरती ॥ १६९ ॥
विरळा पहावयाला पुरुष असा सांपडे पुन्हां लोकीं ॥
शोकीं तद्गुण वर्णुनि उतराई लेशमात्र झालों कीं ॥ १७० ॥
हा मृत्युलोक आहे जाणुनि कामें करावया जागा ॥
वागा नीट जपोनी कर्तव्याच्या पदीं सदा जागा ॥ १७१ ॥
श्रीधूतपाप अपुल्या संन्निध तात्यांस कां न दे वास ॥
सेवा सकळ जनांची करुनी करिती प्रसन्न देवास ॥ १७२ ॥
सांगा कधीं कुणाचें चाले लोकांत अक्षय क्षेम ॥
नेम नसे मृत्यूचा जडतें तरि सद्गुणांवरी प्रेम ॥ १७३ ॥
करुनी अलिप्त असणें मिळवुनि कीर्ति हळूहळू वित्ता ॥
चित्तास शांति यावी म्हणुनी हा ठेविला असे कित्ता ॥ १७४ ॥
तरुणांनीं लागावें तात्यांचें वळण नित्य वळवाया ॥
पळवाया सोडुं नये उचित दिसें हें मलाहि कळवाया ॥ १७५ ॥
सद्गदकंठें प्रेमें अर्पण केल्या यथामती आर्या ॥
आर्यास वंदुनी त्या खिन्नमनें लागतों दुजा कार्या ॥ १७६ ॥

श्रीधूतपापेश्वर आयुवद ट्रस्ट.

स्थापना चैत्र शु॥ १ शके १८५५



आयुर्वेद मंदिर,—पनवेल.

[ परिशिष्ट ब

परिशिष्ट [ ब ]

श्री

# श्रीधूतपापेश्वर आयुर्वेद ट्रस्ट.

## चिकित्सितात्पुण्यतमं न किञ्चिदपि शुश्रुम।

—सुश्रुत

१ श्रीधूतपापेश्वर कारखाना सुरूं झाला त्यावेळीं जनतेस आयुर्वेदीय औषधें सुलभतेनें मिळत नव्हतीं. हा कारखाना सुरूं झाल्यावर तीं अधिकाधिक सुलभ झालीं. पुढें दुसरेही कारखाने सुरूं झाले आणि आतां आयुर्वेदीय औषधें सर्वत्र सहज सुलभ झालीं आहेत. **श्रीधूतपापेश्वर कारखान्यांतील औषधांची शास्त्रोक्तता व तज्जनित लोकप्रियता प्रसिद्धच आहे.**

२ श्रीधूतपापेश्वर कारखान्याकरवीं कांहींतरी आयुर्वेदशास्त्रसेवा व लोकसेवा व्हावी अशी फार वर्षांपासून म्हणजे कारखान्यास ऊर्जितावस्था आल्यापासून चालकांची इच्छा होती. कारखान्याचे मूळ संस्थापक **कै. विष्णुशास्त्री** यांची या बाबतींत फार मोठी महत्त्वाकांक्षा असे. परंतु दुर्दैवानें त्यांचें अकालीं व आकस्मिक निधन झाल्यानें ती अपूर्ण राहिली.

३ व्यापाराबरोबरच शास्त्रसेवा व लोकसेवा करूं म्हटलें, मनांत तसें फार असलें व त्या दृष्टीनें प्रयत्नही केला तरी तें काम समाधानकारक होत नाहीं तेव्हां **अल्पांशानें कां होईना केवळ शास्त्रसेवा किंवा लोकसेवा करणें असेल तर तें कार्य व्यापारापासून अलग राखलें पाहिजे.** हें चालकांनीं ओळखून त्याप्रमाणें एक ट्रस्ट करण्याची योजना आंखली. कायद्याच्या दृष्टीनें आणि शास्त्रीय विषयाच्या दृष्टीनें ती सर्वांगसुंदर व्हावी म्हणून त्या त्या विषयांच्या तज्ज्ञांचा सल्ला घेतला व तो त्यांनीं मोठ्या आनंदानें देऊन चालकांस उपकृत केलें, त्यामुळें आतां ही योजना निर्दोष झाली आहे. ट्रस्टच्या सल्लागार मंडळांतील नियोजित सभासदांनींही मंडळाचें सदस्यत्व स्वीकारून या कार्यास मोठीच मदत करण्याचें पत्करिलें आहे.

४ सदरहु योजनेप्रमाणें श्रीधूतपापेश्वर कारखान्याचे संस्थापक **के. विष्णुशास्त्री पुराणिक** यांचे उभयतां चिरंजीव, **गंगाधर विष्णु पुराणिक व महादेव विष्णु पुराणिक** यांनीं आपली पनवेल येथील **७५००० पंचाहत्तर हजार रुपये किंमतीची इमारत व बाग व ५०००० पन्नास हजार रुपये** देऊन **एक पब्लिक ट्रस्टडीड सोमवारं चैत्र शु. १ शके १८५५ ता. २७ मार्च सन १९३३ रोजीं करण्यांत आलें आहे.**

५ या ट्रस्टबद्दल महत्त्वाची माहिती पुढीलप्रमाणें आहे.

## ट्रस्टीज–

**डॉ. नीलकंठ भालचंद्र भाटवडेकर,** बी. ए. एम्. बी. बी. एस्. गिरगांव—मुंबई.

**रा. पुंडरीकाक्ष गदाधर पुराणिक,** पनवेल—कुलाबा.

**रा. गंगाधर विष्णु पुराणिक,** वहिवाटदार ट्रस्टी, पनवेल—कुलाबा.

## ट्रस्टचें पहिलें सल्लागार मंडळ.

( पहिल्या सुमारें पांच वर्षांचे मुदतीकरितां )

१ **भिषग्वर डॉ. ए. लक्ष्मीपति,** एम्. बी. सी. एम्. ( मद्रास ) निखिल भारतीय वैद्य महासंमेलनाचे हल्लींचे अध्यक्ष.

२ **वैद्यराज यादवजी त्रिकमजी आचार्य** ( मुंबई )

३ **डॉ. कृष्णाजी श्रीपाद म्हसकर,** एम्. डी., एम्. ए. बी. एस् सी., डी. पी. एच., डी. टी. एम् ( मुंबई )

४ **वैद्यभूषण वामनशास्त्री दातार** ( नाशिक )

५ **आयुर्वेदाचार्य पुरुषोत्तमशास्त्री नानल** ( पुणें )

६ **वैद्यपंचानन गंगाधर गोपाळ गुणे** ( अहमदनगर )

७ **श्री. रा. रा. गणेश गोविंद नवरे** ( शीव–मुंबई )

८ **श्री. रा. रा. रामचंद्र कृष्णशास्त्री पुराणिक** ( पनवेल )

## ट्रस्टचें कार्य.

ट्रस्टडीडमध्यें अमुकूलतेप्रमाणें यथावकाश खालील कामें व्हावीं असें आहे.

( १ ) **श्रीधूतपापेश्वर** मूर्तीची स्थापना व्हावी व तत्संबंधीं नियमित धार्मिक कृत्य व खर्च व्हावा.

( २ ) **वैद्यशास्त्रविषयक पदार्थसंग्रह** करावा व त्याचें प्रदर्शन तयार करावें. यांत आयुर्वेदीय पदार्थांस जास्त महत्त्व द्यावें.

( ३ ) वनौषधींच्या नमुन्यांचा संग्रह करावा. वनौषधींची लागवड करून **वनौषधिउद्यान** तयार करावें व संदिग्ध वनौषधींचा निर्णय करावा.

( ४ ) **औषधींचा असंदिग्ध गुणनिश्चय, त्यांचें परीक्षण आणि निर्दोष, उपयुक्त व जास्तींत जास्त गुणकारी औषधें तयार करण्याच्या पद्धतींचा निश्चय करावा.**

( ५ ) **त्रिदोष सिद्धांताचें स्पष्टीकरण** करावें.

( ६ ) आयुर्विद्याविषयक—प्रामुख्यानें आयुर्वेदीय—व तदनुषंगिक शास्त्रांचा छापील व हस्तलिखित **ग्रंथसंग्रह** करणें व योग्य त्या अप्रसिद्ध ग्रंथांस प्रसिद्धी देणें.

( ७ ) **आयुर्वेद विद्यालय** स्थापन करून त्यांत आयुर्वेद व आयुर्वेदोपयोगी अन्य शास्त्रें व विषय शिकवून त्या मार्गानें व तसेंच इतर उपलब्ध मार्गांनीं आयुर्वेदीय ज्ञानाचा प्रसार करणें व प्रयत्नपूर्वक आयुर्वेदाची उपयुक्तता वाढविणें.

( ८ ) आधुनिक शास्त्रांच्या किंवा अनुभवाच्या साहाय्यानें **आयुर्वेदाचा परिपोष** करणें व आयुर्वेदांतील जुन्या **लुप्तप्राय उपयुक्त कार्यांचा पुन्हां प्रचार** करणें.

( ९ ) **धर्मार्थ दवाखाना, रुग्णालय, सूतिकागृह** अशा लोकोपयोगी **वैद्यकविषयक** व **आरोग्यविषयक** संस्था चालविणें, आरोग्यविषयक संस्थांस नियमित मदत करतां यावी म्हणून या ट्रस्टमध्यें तूर्त ५००० पांच हजार रुपयांची रक्कम स्वतंत्र दिली आहे व तिच्या विनियोगाबाबत खुलासा केला आहे. ही रक्कम पुढें ट्रस्टींनीं वाटल्यास ट्रस्टचे उत्पन्नांतून वाढवावयाची आहे.

(१०) **रोगांचे सांथींचे वेळीं** शक्य तों फुकट किंवा अल्प किंमतीनें त्या त्या रोगावर औषधें पुरविणें व वैद्यकीय मदत देणें.

(११) **निखिल भारतायुर्वेद विद्यापीठाच्या तीन पदवी परीक्षांत उत्तीर्ण होऊन पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्यास खालीलप्रमाणें पारितोषिक** देणें.:—

| पदवी परीक्षा | पारितोषिकाचें नांव | रक्कम. |
|---|---|---|
| १ आयुर्वेदाचार्य | श्रीधूतपापेश्वर पारितोषिक | रु. २५ |
| २ आयुर्वेदविशारद | कै. विष्णुशास्त्री पुराणिक पारितोषिक | रु. ११ |
| ३ आयुर्वेदभिषक् | कै. कृष्णशास्त्री पुराणिक पारितोषिक | रु. १५ |

या रकमा कमी जास्ती करण्यास तसेंच हीं किंवा अशींच बक्षिसें दुसऱ्या कोणत्याही योग्य संस्थेस अगर व्यक्तींस देण्यास ट्रस्टी मुखत्यार आहेत. त्याचप्रमाणें पारितोषिक रोख रकमेनें किंवा पदकें अथवा पुस्तकें अशा स्वरूपांत देणें हें ट्रस्टींचे इच्छेवर अवलंबून राहलि.

**मुख्य हेतु आयुर्वेदद्वारां आयुर्विद्येची उन्नति व्हावी हा आहे.** देशकालाप्रमाणें कार्यक्षेत्र व कामाचा तपशील बदलूं शकेल, म्हणून कार्यक्षेत्र व कामाचा तपशील मर्यादित केलेला नाहीं.

**स्ट्रस्टचें ध्येय व्यापक आहे.** जरूरीप्रमाणें व अनुकूलतेप्रमाणें निसर्गोपचार, योगोपचार, मंत्रोपचार, मानसोपचार, इत्यादि उपचार पद्धतींचें संशोधन व उपयोग करून रोगनिवारणाचें कार्य या ट्रस्टकडून करितां येईल. कारण मुख्य हेतु मनुष्य निरोगी व्हावा व निरोगी रहावा हा होय व तो आयुर्वेदोन्नतीचे द्वारें बहुतांशीं पुरा होईल, अशी ट्रस्टचे संस्थापकांची श्रद्धा असल्यानें आणि विशेषतः **श्रीधूतपापेश्वर आयौषधि कारखाना** ही संस्था या ट्रस्टची जनक असल्यानें "**श्रीधूतपापेश्वर ट्रस्ट**" असें नांव ट्रस्टला दिलें आहे. आणि ट्रस्टकडून **आयुर्वेदीय चिकित्सेचाच अवलंब प्रामुख्यानें करण्यांत यावयाचा आहे.**

ह्या आयुर्वेद ट्रस्टचे इमारतींत हल्लीं धर्मार्थ दवाखाना सुरू आहे. तो नुकताच ता. १९ जुलै सन १९३३ रोजीं स्थापन झालेला असतांहि याचा फायदा आजुबाजूचे गोरगरीब लोकांस पुष्कळच होऊं लागला आहे. रोज सरासरी पावणे दोनशें दोनशें रोग्यांची हजेरी असते.

हें फारच मोठें पुण्यकर्म श्री. नानासाहेब व त्यांचे धाकटे बंधू श्री. माधवराव यांचे हातून आज घडत आहे. सन १८९६ सालीं ज्या वेळीं स्वत्वनिवृत्तीचा उच्चार प्रथम झाला. त्यावेळीं ज्याची स्वत्वनिवृत्ति अपेक्षित होती त्या कारखान्याच्या त्या वेळच्या किंमतीच्या मानानें आज त्याहून तिप्पट किंमतीच्या मिळकतीचा आयुर्वेद ट्रस्ट झाला आहे. व यापुढें प्रसंगोचित या ट्रस्टला कारखान्याकडून वेळोवेळीं मदत होणारच आहे. तो वृत्तांत भविष्यकालच सांगेल. त्यावेळीं विष्णु तात्यांचा हा एक गरिब हितचिंतक व सल्लागार हयातहि नसेल ! हा दुर्निवार विचार मनांत येऊन अंतःकरण भरून येतें !

स्वत्वनिवृत्तीला याहून अधिक व्यापक स्वरूप देणें कायद्याप्रमाणें व व्यवहाराप्रमाणें आज सोयीचें नाहीं. तथापि मी इतकें माझ्या स्वतःचे माहितीनें निश्चयानें सांगतों कीं महत्त्वाकांक्षेंत कैं. तात्यासाहेबांचे चिरंजीव मुळींच मागें नाहींत उलट त्यांच्या महत्त्वाकांक्षेस देशकालानुसार जें मूर्तस्वरूप ईशसत्तेनें येईल तें जनतेस जास्तच उपयुक्त व आदरणीय वाटेल. तसेंच त्यागबुद्धींतहि ते आपल्या घराण्याला मागें टाकतील यांतहि शंका नाहीं.

श्री. नानासाहेबांनीं कारखान्यासंबंधीं अनेक सुधारणांच्या योजना आज प्रत्यक्ष हातीं घेतल्या आहेत. त्या हस्तपत्रकांच्या द्वारां व प्रत्यक्ष लोकांचे नजरेस येतीलच. श्री. नानासाहेब यांच्यापुढें अत्यंत उज्ज्वल असें भविष्य आहे. त्यांतून धीरानें, औदार्यानें, कर्तबगारीनें व पुण्यमार्गानें पार पडण्यास ईश्वर त्यांस उत्कृष्ट आयुरारोग्य, बुद्धि व इतरत्र अनुकूलता देवो, व त्यांच्या ओजस्वी मनास त्यांच्या पुण्यवान वडिलांचा हा स्मारक चरित्र ग्रंथ नित्य स्फूर्तिदायक होवो ! अशी श्रीधूतपापेश्वरचरणीं माझी पुनः पुन्हां प्रार्थना आहे.

परिशिष्ट [ क ]

# श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखाना.

स्थापना

संवत् १९२९ ] पनवेल–कुलाबा [ सन १८७२

## भस्में, रसायनें, मात्रा, कुपिस्थ रसायनें, सत्व, क्षार, द्राव, आसवें, गुग्गुळ, गुटिका, वटिका, अरिष्टें, चूर्णें, घृतें, तैलें, मलमें, लेप, अर्क, मोरावळा, गुलकंद, गुलाबी सरबत.

अवलेह, पाक, जुनीं भस्में, रसायनें, इत्यादि औषधें मूळ किंमतींत मिळण्याकरितां

हिंदुस्थानांतील बहुतेक शहरीं एजंट नेमले आहेत.

ज्या शहरीं किंवा गांवीं इकडील एजंट नसेल तेथील व्यापारी, वैद्य, डॉक्टर यांनीं एजन्सीच्या व कमिशनच्या नियमांची मागणी करावी व औषधें मागवावींत.

व्यापाऱ्यांच्या व ग्राहकांच्या सोईकरितां मराठी, इंग्रजी, हिंदी, गुजराथी, कानडी भाषेंत अनुपान पुस्तकें व पत्रकें छापिलीं आहेत.



रोगी लोकांनीं आपलें प्रकृतिमान कळविल्यास योग्य तो सल्ला दिला जाईल व योजना करून औषधेंही पाठविलीं जातील.

गंगाधर विष्णु पुराणीक

चालक

श्रीधूतपापेश्वर आर्यौषधींचा कारखाना, पनवेल.

# औषधें मिळण्याचीं ठिकाणें.

खालीं दिलेल्या यादींत कारखान्यांतील औषधें विशेष जास्त प्रमाणांत नेऊन विक्री करणाऱ्या एजंटांचीं मात्र नांवें दिलीं आहेत. कारखान्यांतून विक्रीकरितां नेहेमीं औषधें नेणाऱ्या एकंदर सर्व व्यापाऱ्यांची संख्या फारच मोठी असल्यानें त्यांचीं नांवें येथें देणें शक्य नाहीं.

**मुख्य ठिकाण**—**पनवेल**, आर्यौषधिकारखाना यांत थोडीं, फार, जुनीं, नवीं औषधें मिळतात व ग्राहकांकडे रवाना होतात.

## मुंबई शहर

**ठाकुरद्वार**–श्रीधूतपापेश्वर औषधि संग्रहालय ट्रॅमरस्ता, नंबर २

**भुलेश्वर**–गोपाळकृष्ण तांबवेकर, लायब्ररीसमोर, दुसरा मजला.

**ठाकुरद्वार**–रघुनाथ नारायण सन्स्.

**गिरगांव**–पी. आर. जोशी ब्रदर्स.

**गिरगांव**–निळकंठ रावजी महाजन, आंग्रेवाडी.

**गिरगांव**–पाटीलब्रदर्स मोहन बि.

**दादर**–मुळे ब्रदर्स, पाध्ये बिल्डिंग.

**दादर**–संत ब्रदर्स, पाध्ये बिल्डिंग.

**खडामाडुंगा**–एस्.एम्. वर्बक ब्रदर्स.

**डंकनरोड**–तय्यबअली इसाजी हिराणी.

## ठाणें जिल्हा

**कल्याण**–एस. के. फाटक, स्टेशनरोड.

**कुर्ला**–मुरलीधर विष्णु डिके.

**ठाणें**–लक्ष्मण गजानन जोशी, जांभळीनाका.

**भिवंडी**–केशव गोविंद बिवलकर.

**कल्याण**–सहस्रबुद्धे आणि मंडळी.

**मुरबाड**–महादेव बाळकृष्ण जोशी.

## कुलाबा जिल्हा

**पनवेल**–श्रीधूतपापेश्वर स्थानिक दवाखाना.

**पनवेल**–प्रभाकर रघुनाथ जोशी.

**चौक**–मोरो नारायण हनुमंते.

**कर्जत**–कीकाभाई महंमदअली.

**खोपवली**–मियाचंद मेघाजी.

**पेण**–विष्णु नारायण मंडलीक.

**महाड**–तुळजाराम मेठा गुजर.

**उरण**–शा. हरिलाल करसनदास.

**रोहें**–चुनीलाल अमरसी परिख.

**गोरेगांव**–हरि नारायण आठवले.

**मुरुड-जंजिरा**–हुसेनअली कंपनी.

**मुरुडजंजिरा**–बाळकृष्ण रामचंद्र पेंडसे.

**तळें**–नारायण विष्णु बर्जे.

## रत्नागिरी जिल्हा.

**रत्नागिरी**–प्रभाकर वि. जोशी.

**खेड**–मोरो सखाराम पेंडसे.

**धोपेश्वर**–भालचंद्र शि. कुरंबळेकर.

**दापोली**–मोरो रामचंद्र रिसबूड.
**खानोली**–अनंत विष्णु खानोलकर.
**केळशी**–विष्णु चिंतामण वर्तक.
**अंजनवेल**–मथुरादास हिरजीभाई.
**अंजनवेल**–रामचंद्र हरशेट जठार.
**मालवण**–गंगाधर रघुनाथ दलाल.
**वेंगुर्ले**–नारायण कानू जोशी.
**सावंतवाडी**–बाळकृष्ण वासुदेव आजगांवकर.
**गोवें**–रामचंद्र पां. वैद्य, हिंदुफार्मसी.

### पुणें जिल्हा.

**पुणें**–विनायक भि. खरे, बुधवारपेठ.
**पुणें**–मुरलीधर विष्णु डिके, ८०९ सदाशिव पेठ.
**मंचर**–भिमाजी सखाराम राजमेस्त्री.

### सातारा जिल्हा.

**वाई**–वैराज स्टोअर्स.
**कऱ्हाड**–गणपत ज्ञानोबा बटाणे.
**सातारा**–दत्तात्रय रामकृष्ण कुळकर्णी.
**सातारा**–विष्णु गणेश डिंगणकर.

### सोलापूर जिल्हा.

**सोलापूर**–पु. व्यं. बक्षी ब्रदर्स.
**सोलापूर**–श्रीनिवास प्रल्हाद वैद्य, कसबा विठ्ठलमंदिराजवळ.
**बार्शी**–दिनकर महादेव पटवर्धन.
**पंढरपूर**–दत्तात्रय वामन देशपांडे.
**मोडनिंब**–गणेश गोविंद गोरे.

### नगर जिल्हा.

**नगर**–गोविंद विष्णु फडके शास्त्री.
**कोपरगांव**–रामचंद्र भि. चव्हाण.

### नाशिक जिल्हा.

**नाशिक**–नागेश महादेव पाठक.
**नाशिक**–रामचंद्र गंगाधर पेंढारकर.
**येवलें**–रंगनाथ रामदास दुकान.
**सटाणें**–डी. एस. पंडित.

### खानदेश जिल्हा.

**जळगांव**–शंकर अनंत जोशी.
**जळगांव**–भगिरथ पांडुरंग वैद्य.
**धुळें**–श्रीदत्तात्रय कंपनी.
**नंदूरबार**–मराठे आणि सन्स.
**अमळनेर**–धों. के. पुसाळकर वकील.
**धरणगांव**–रघुनाथ माधव भावे.
**एरंडोल**–प्रभाकर कोंडो वहाळकर.
**रावेर**–गोपाळदास शिवलालशेट.
**सावदें**–निंबराज केशव कुळकर्णी.
**शेंदुर्णी**–श्रीधर चिमणाजी नाईक.
**भुसावळ**–शंकर अनंत जोशी.
**जामनेर**–श्रीधर विठ्ठल दामले.
**पाचोरें**–एम्. जी. धर्माधिकारी, स्व. स्टोअर्स.
**सायगांव**–डी. पी. देशपांडे.
**चाळिसगांव**–रघुनाथ स. मांडे.

**भडगांव**–अकबरअल्ली इसूफअल्ली.
**प्रकाशें**–पुंडलीक वासुदेव जोग, बुकसेलर.
**यावल**–पितांबर चुनीलाल.
**चोपडें**–चुनीलाल विष्णु नेवे.

## बेळगांव जिल्हा.

**बेळगांव**–सखाराम वि. सहस्त्रबुद्धे.
**अकोळ**–गोविंद सदाशिव कुळकर्णी. ब्रदर्स.
**निपाणी**–वामन जनार्दन दिक्षित.
**खानापूर**–नारायण रा. यादवशेट.
**गोकाक**–चंदप्पा जिनप्पा डोंगरी.
**नंदगड**–वामन विठ्ठल शहापूरकर.

## धारवाड जिल्हा.

**हुबळी**–गोविंद व्यंकटेश शिमोगी दुर्गद बैल.
**धारवाड**–प्र. वि. खंडकर, दत्तात्रय रोड.
**कदरमंडलगी**–रामण्णा तिपण्णा सालेर.

## कोल्हापूर संस्थान.

**कोल्हापूर**–यशवंत जि. कुळकर्णी.
**सांगली**–नरहर लक्ष्मण गोडसे.

## विजापूर जिल्हा.

**विजापूर**–बापूजी दिगंबर पाटणकर.
**विजापूर**–वा. श्री. आपटे, विजापूर स्टोअर्स.

## कारवार जिल्हा.

**शिरसी**–एस. एल. धाकाप्पा.
**शिरसी**–नरसिंह शिवराम हेगडे.

## बुलढाणें जिल्हा.

**बुलढाणें**–आर. जी. देशपांडे को. स्टोअर्स.
**शेगांव**–गोपाळ सदाशिव पाठक.
**नांदुरा**–नथू रुष्णाजी भिसे.
**खामगांव**–रघुनाथ केशव केळकर.
**खामगांव**–व्ही. एम्. झालटे.
**मलकापूर**–लक्ष्मण सुंदरसा सदावर्ते.
**चिखली**–करमअल्लीखां सौदागर.
**जळगांवजामोद**–लाला चंदनलाल.

## अकोला.

**अकोला**–व्ही. धर्मपुरी नरसय्या.
**वाशिम**–शंकर केशव देशपांडे.
**मूर्तिजापूर**–केसरीचंद गोविंद बडनेरकर.
**कारंजा**–नारायण हरीसा कट्यारमोल.
**अकोट**–जनार्दन बाळकृष्ण वैद्य.
**अकोट**–बापू जानराव देशपांडे.
**रिसोड**–विश्वनाथ रामनाथ शर्मा.

मालेगांवजहागीर–उ. ल. सावरकर.
बोरगांवमंजू–बाळारामसिंह आकारामसिंह.

## उमरावती जिल्हा.

उमरावती–नारायण रामचंद्र जोशी, भुसारी गेट.
इलिचपूर–किसनलाल बिरदीचंद.
इलिचपूर–बी. एच. अग्रवाल.
धामणगांव–हरभिाऊ चंद्रभान.
शिरसगांव कसबा–गणपतराव हिरामणजी भोंडे.
सुर्जीअंजनगांव–गणपत श्रावणजी महाजन.
चांदूरबझार–अकबरअली शरफअली.
चांदूर रेल्वे–गणपत हरबाजी वानेरे
मोर्शी–धंपतराय C/o एस्. एल्. नाईक.
वानोसा–गोविंदराम मुरलीधर मारवाडी.
साऊर–अण्णा बाबाजी वानखेड.
पथ्रोट–के. आर. निमकर.

## यवतमाळ जिल्हा.

मोतीबाग दारव्हा–मनोहर कं.
यवतमाळ–रामचंद्र गणपत गव्हाणे.
यवतमाळ–भास्कर वामन बोरीकर ब्रदर्स.
पुसद–शंकर सखाराम सरनाईक.
घाटंजी–कृष्णापा म. सावकार.
उमरखेड–गणपत अंबादास जोशी.

## नागपूर

नागपूर–रामचंद्र पांडुरंग रोडी, आईतवारी.
नागपूर–श्रीगणेश मंडळी, क्रॅडॉक टाऊन.
नागपूर–श्रीलक्ष्मीभांडार, सिताबर्डी.
नागपूर–वासुदेव विष्णु ओक, केळीबाग.

## वर्धा

वर्धा–चिंतो महादेव काळे अँड सन्स.
हिंगणघाट–इब्राहिम मुल्ला म. अली.
पुलगांव–धोधारी ब्रदर्स.
देवळी–एम्. एम्. काशीकर.

## सी. पी.

जबलपूर–हर्षे आणि मंडळी, जवाहर गंज.
बैतूल–गोविंद तात्या राजापूरकर.
बऱ्हाणपूर–शिवराम लक्ष्मण भिडे.
खांडवा– धी. नेमाड स्टोअर्स.

**सौंसर**–शेट शिवरतन महेसरी.

**लोधीखेडा**–रघुनाथ शामलाल.

**हरदा**–हुसंगाबाद–वि. वि. बापट, हरिपुरा.

**कानपूर**–यू. पी. मुळचंद जैन.

**मद्रास.**

**कोइमतूर**–बी. शामाचार्य ज. मर्चंट.

**संस्थानें.**

**दावणगिरी**–पं. चंद्रशेखरराव वैद्य.

**बडोदें**–सिताराम गंगाधर देव, रावपुरा.

**जालना**–जी. आर. शिवणकर.

**उस्मानाबाद**–श्रीपत स. सराफ.

**गुलबुर्गा**–परशराम जाजी.

**हैद्राबाद**–हरिपंत मसलेकर.

**जालना**–यशवंत रंगनाथ पुराणिक.

**सेडम**–लोकेश्वर दीक्षित.

**हिंगोली**–राजाराम अ. पाठक.

**इंदुर**–कृष्णराव गो. शौंचे, न्यू मार्केट.

**मंडलेश्वर**–मुल्ला हसनभाई गुलामहुसेन.

**कपडवज गुजराथ**–दलसुख रणछोड.

# सूचना.

मूल्यवान औषधें, वनौषधी व त्यांचे बनलेले पदार्थ, उपयुक्त तयार औषधें, उपचारोपयोगी वस्तु व यंत्रें, वैद्यकीय पुस्तकें यांचे भाव कधीं कमी, कधीं अधिक होतील; अमानत किंवा रोख पैसा आल्यानंतर ज्याप्रमाणें भाव असेल त्याप्रमाणें यांची रवानगी होईल. एखादी वस्तु मिळणारही नाहीं व केव्हांही परत घेण्यांत येणार नाहीं. पत्रव्यवहारानें अधिक खुलासा करूं.

## सूचना.

पुढें औषधांच्या किंमतीच्या यादींत नंबरापुढें औषधांचीं नांवें व टिकाऊपणांच्या खुणा दिल्या आहेत. त्या येणेंप्रमाणें:—

** अक्षय टिकाऊ व जुनें तितकें जास्त कडक. * अक्षय टिकाऊ, † १० वर्षें, ‡ ५ वर्षें, + २ वर्षें, §, वर्ष, ¶ ६ महिने, ० २ महिने.

टिकाऊपणांच्या खुणांच्या पुढें जाड अक्षरें घातलीं आहेत त्या अक्षरांसंबंधानें खुलासा येणेंप्रमाणें:—

**प.**–पुष्कळ सौम्य. पाहिजे त्या वेळीं कोणीही उपयोग करावा. फार थंड वेळीं व अग्निमांद्य असतां घेऊं नये.

**स.**–सौम्य. केव्हांही घ्यावें, अवगुण नाहीं; दुपारीं घेणें.

**म.**–मध्यम कडक. जाणत्या मनुष्यानें याचा उपयोग सायं व रात्रीं, क्वचित् सकाळीं करावा. दुपारीं करूं नये.

**क.**–कडक. असे औषधांचा उपयोग वैद्याचे मतानें करावा. जास्त उपयोग न करणेकडे लक्ष रहावें.

**अ.**–अति कडक. वैद्यांनींच रोग्याजवळ राहून उपयोग करावा. गुण तात्काळ येतो. निरुपाय म्हणून दिवसां दोनप्रहरीं व उन्हाळ्यांत विशेष जरूर तर जपून देणें.

**फ.**–अफूयुक्त. जुलाब बंद होण्यापुरताच उपयोग.

**ड.**–डोळ्यांत घालण्याचीं औषधें. यावांचून दुसरें कोणतेंही औषध डोळ्यांस लागूं देऊं नये.

**ज.**–जुलाब होण्याचें औषध. इच्छाभेदीवरील विधि पहा.

**ब.**–बहुगुणी. एका रोगावर म्हणून योजना केली तरी दुसऱ्या अनेक रोगांवर गुणदायक.

**न.**–निरुपद्रवी. दुसरा कोणताही त्रास न होणारें.

---

# औषधांची नंबर व किंमतीसह यादी.

## १ भस्में.

| | | दर तो. किं. रुपये. |
|---|---|---|
| १ अभ्रकभस्म सहस्रपुटी* | अ | ६० |
| २ अभ्रकभस्म* | बनक | १५ |
| ३ कपर्दिभस्म* | बनम | ०६ |
| ४ कासीसभस्म* | म | -॥- |
| ५ जसदभस्म* ... | डम | २ |
| ६ ताम्रभस्म* ... | क | ३ |
| ७ त्रिवंगभस्म* ... | क | ३ |
| ८ नागभस्म* ... | क | ३ |
| ९ पित्तलभस्म* | क | १॥ |
| १० प्रवाळभस्म* अ.पु.नं.१ | बनस | २ |
| ११ प्रवाळभस्म* अ.पु.नं.२ | बनस | १ |
| १२ प्रवाळभस्म* सूर्यपुटी | प | १ |
| १३ प्रवाळभस्म* चंद्रपुटी | बनप | १ |
| १४ मधुमण्डूर* ... | बनम | २ |
| १५ मंडूरभस्म* (बालमंडूर) | बनस | १ |
| १६ मौक्तिकभस्म* | नस | ४० |
| १७ मृगशृंगभस्म* ... | नस | ०८ |
| १८ रौप्यभस्मकृष्ण* | बक | ४ |
| १९ कान्तलोहभस्म* | बक | १० |
| २० तीक्ष्णलोहभस्म* | क | २ |
| २१ वंगभस्म* ... | बम | २ |
| २२ स्वयमग्निलोहभस्म* | क | २ |
| २३ शौक्तिकभस्म* | बनस | १ |
| २४ शंखभस्म* ... | म | ०८ |
| २५ सुवर्णमाक्षिकभस्म* | बनम | २ |
| २६ हरितालभस्म* | अ | ५ |

( सुवर्ण, रौप्य, लोहभस्मयुक्त. )

## २ रसायनें व मात्रा

| | | दर तो. किं. रुपये. |
|---|---|---|
| २७ अग्निकुमार† ... | म | १ |
| २८ अग्निसुत† ... | म | १ |
| २९ अर्शःकुठार* ... | क | १॥ |
| ३० अश्वकंचुकी प्राकृत घोडाचोळी+ ... | बक | २ |
| ३१ अश्विनीकुमार† | म | ३ |
| ३२ आनंदभैरव अतिसार† | फम | १॥ |
| ३३ आनंदभैरव खोकला† | म | १॥ |
| ३४ इच्छाभेदी+ | जक | १ |
| ३५ उन्मत्तरस+ | क | १ |
| ३६ एकांगवीर* ... | क | ६ |
| ३७ कफकुठार* ... | क | २ |
| ३८ कामदुघा* ... | बनस | ४ |
| ३९ कालकूट* ... | अ | ५ |
| ४० कृमिकुठार† | म | २ |
| ४१ क्रव्यादरस† ... | क | २ |
| ४२ गर्भपालरस† | नम | २॥ |
| ४३ गलत्कुष्ठारी+ ... | म | ५ |
| ४४ गुल्मकालानल† ... | म | ३ |
| ४५ गंडमालाकंडनरस* | म | २ |
| ४६ गंधकरसायन नं. १* | बक | २॥ |
| ४७ गंधकरसायन नं. २* | बम | ०८ |
| ४८ ग्रहणीवज्रकपाट*... | क | १२ |
| ४९ ग्रहणीकपाट† ... | म | १॥ |
| ५० चतुर्मुख* ... | बक | १० |
| ५१ चंद्रकला† ... | म | ६ |

| | | |
|---|---|---|
| ५२ | चंद्रशेखररस* ... | बनम ४ |
| ५३ | चंद्रोदयवर्ति† | डक १॥ |
| ५४ | चौसष्टीपिंपळी+ | अ ३ |
| ५५ | पूर्णचंद्रोदय (खल्वी)* | नक १५ |
| ५६ | जलोदरारि+ ... | जअ ३ |
| ५७ | ज्वरमुरारि† | नस १॥ |
| ५८ | ज्वरांकुश* | म १ |
| ५९ | तालकादि वटी* | क ४ |
| ६० | त्रिभुवनकीर्ति† | म १॥ |
| ६१ | तृष्णाभ्रंश† ... | नस २ |
| ६२ | त्रैलोक्यडंबर रस* | अ ५ |
| ६३ | दरदपुटपाक+ ... | फक २ |
| ६४ | नवज्वरेभसिंह† | म २ |
| ६५ | नारसिंहरस* ... | क ५ |
| ६६ | नित्यानंदरस† | नम ३ |
| ६७ | पाशुपतास्त्ररस* | क १५ |
| ६८ | पुष्पधन्वा† ... | क ५ |
| ६९ | पंचवक्त्ररस† ... | क २ |
| ७० | पंचामृतपर्पटी* ... | बम ४ |
| ७१ | प्रतापलंकेश्वर† | बनस २ |
| ७२ | प्रदररिपु† | नम १ |
| ७३ | प्रदरारि† | क १ |
| ७४ | प्रबोधांजन† | क १ |
| ७५ | प्रमदानंदरस† | फम १॥ |
| ७६ | प्रवाळपंचामृत* | बनस ५ |
| ७७ | प्राणेश्वररस* ... | क ९ |
| ७८ | बालसूर्योदय* ... | क ९ |
| ७९ | बालार्क† ... | म १ |
| ८० | बोलबद्ध† | बनस २ |
| ८१ | बृहच्छंखवटी† ... | क २ |
| ८२ | भूतभैरव* ... | क ४ |
| ८३ | महाज्वरांकुश† ... | बम १॥ |
| ८४ | महामृत्युंजय† ... | म १॥ |
| ८५ | माणिकरस* ... | म २ |
| ८६ | मेहांतकरसायन† | बम ६ |
| ८७ | मृतसंजीवनीरस* | अ १५ |
| ८८ | मृत्युंजय† ... | म १॥ |
| ८९ | राजचण्डेश्वर* ... | क २ |
| ९० | राजमृगांक* ... | अ १२ |
| ९१ | रामबाणरस† ... | म १॥ |
| ९२ | लघुमालिनीवसंत† | म १॥ |
| ९३ | लक्ष्मीनारायण† ... | म ४ |
| ९४ | लक्ष्मीविलास* ... | क १५ |
| ९५ | लोकनाथरस* ... | म ३ |
| ९६ | वडवानलरस† ... | म २ |
| ९७ | वसंतकुसुमाकर* | बक १२ |
| ९८ | महावातविध्वंस† | क ४ |
| ९९ | वातविध्वंस† ... | म २ |
| १०० | वातरक्तान्तक† | म ४ |
| १०१ | वातराक्षस* ... | अ १२ |
| १०२ | वातारि† ... | फक २ |
| १०३ | वान्तिहृद्रस* ... | म २ |
| १०४ | विश्वतापहरण* ... | क २॥ |
| १०५ | वेतालरस* ... | क २ |
| १०६ | वैश्वानरलोह* ... | क ३ |
| १०७ | वैष्णवीरस+ | क १॥ |

| | | | |
|---|---|---|---|
| १०८ | धैष्णवीवर्ती* ... | क | २ |
| १०९ | शीतांकुश* ... | क | २ |
| ११० | शुद्धशिलाजतु* | बनस | २ |
| १११ | शूलकुठार† ... | म | २ |
| ११२ | शोथारि‡ ... | जक | २ |
| ११३ | शंखवटी† ... | म | ०८ |
| ११४ | शंखोदररस‡ ... | अ | १॥ |
| ११५ | श्वासकुठार+ ... | म | १॥ |
| ११६ | सन्निपातभैरव* | अ | ३ |
| ११७ | सिद्धलक्ष्मीविलास* | बक | १५ |
| ११८ | सिन्दूरभूषण* | बनम | ६ |
| ११९ | सुवर्णपर्पटीरस* | क | १५ |
| १२० | सुवर्णमालिनीवसंत* | क | ६ |
| १२१ | बृहत्सुवर्णमा.वसंत* | क | १२ |
| १२२ | सूतशेखर† नं. १ | | |
| | (सुवर्णयुक्त) | बनम | ५ |
| १२३ | सूतिकाभरण* | अ | १२ |
| १२४ | स्मृतिसागर* | अ | ६ |
| १२५ | हेमगर्भ* | क | १५ |
| १२६ | हेमाभ्रकरससिन्दूर* | क | १५ |
| १२७ | क्षयकुठार* | क | ५ |

## ३ कुपिस्थरसायनें.

दर तो. किं. रुपये.

| | | | |
|---|---|---|---|
| १२८ | अष्टधातुरसायन* | अ | १० |
| १२९ | त्रिपुरभैरव* | अ | ६ |
| १३० | दरदसिंदूर* | अ | ६ |
| १३१ | मल्लसिंदूर* | अ | ६ |
| १३२ | रससिंदूर* | बक | २ |
| १३३ | व्याधिहरणरसायन* | अ | ६ |
| १३४ | समीरपन्नग* | अ | ६ |
| १३५ | सुवर्णराजवंगेश्वर* | म | ६ |

## ४ गुग्गुळ-गुटिका-वटिका.

दर तो. किं. रुपये.

| | | | |
|---|---|---|---|
| १३६ | आदित्यवटिका+ | स | ०८ |
| १३७ | कर्पूरादिवटी+ | स | ०८ |
| १३८ | कांकायनगुटिका‡ | म | ०८ |
| १३९ | कैशोरगुग्गुळ‡ | म | ०६ |
| १४० | खदिरादिगुटिका‡ | स | ०८ |
| १४१ | गोक्षुरादिगुग्गुळ‡ | म | ०६ |
| १४२ | चंद्रप्रभागुटिका‡ | स | १॥ |
| १४३ | जातीफलादिगुटिका‡ | फस | १ |
| १४४ | दाडिमपाकगुटिका‡ | फस | ०८ |
| १४५ | त्रिफलागुटिका¶ | स | ०४ |
| १४६ | दुर्जलजेता‡ ... | स | १ |
| १४७ | द्राक्षादिगुटिका¶ ४तो. | स | -॥- |
| १४८ | नागाच्या गोळ्या‡ | म | २ |
| १४९ | नागामृतगुटिका‡ | क | ४ |
| १५० | पुनर्नवादिवटक‡ | म | ०६ |
| १५१ | महायोगराजगुग्गुळ* | म | १॥ |
| १५२ | योगराजगुग्गुळ† | स | ०८ |
| १५३ | रसेंद्रवटी† ... | म | ३ |
| १५४ | लवंगादिवटिका‡ | म | ०८ |
| १५५ | लशूणवटिका+ | म | ०४ |
| १५६ | लोहगुग्गुळ‡ ... | म | ०८ |
| १५७ | शिलाजतुगुटिका* | स | २ |
| १५८ | सप्तविंशतिगुग्गुळ‡ | म | ०६ |

